भारताच्या स्वातंत्र्याचें
रक्षण करण्यासाठीं
ज्यांनीं हौतात्म्य
स्वीकारलें त्यांच्या
पवित्र स्मृतीस.......

लेखक

# अनुक्रम


- सतीचे वाण १
- करणबहादुर राणा ७
- गंगारामाचा गुगारा ५४
- स्वतंत्र भारताची पहिली लढाई ६१
- हरिश्चंद्राच्या हिकमती ८२
- केवलसिंग १०७
- खेमारामाची बहादुरी १११
- गनर कांबळेची करामत ११६
- महाराष्ट्रीय वैमानिकाचा विक्रम (वीरचक्र) १२३
- नौदल वीराची चोखगोळी १३०

व्हिक्टोरिया क्रॉस

- रिचपाल राम ११
- कमलरामाची कमाल १८
- प्रेमेंद्रसिंग भगत २०
- गाजे घाले २५
- प्रकाश सिंग २९
- मनभक्त गुरुंग ३३
- नामदेव जाधव ३७
- उमराव सिंग ४०
- भगनसिंग राव ४६
- शेरबहादुर थापा ५०

परमवीर चक्र

- सोमनाथ शर्मा ६७
- रामा राघोबा राणे ७४
- जदुनाथ सिंग ७९
- धनसिंग थापा ९०
- मचीसिंगाची समयसूचकता ९७
- जोगिंदर सिंग १०१



# सतींचं वाण

पासष्ट वर्षांपूर्वीची हकीगत आहे ही. त्या वेळीं पाकिस्तान नव्हतें. हिंदुस्थान व अफगाणिस्तान यांच्यामधील टोळीवाल्यांच्या मुलखातील क्रूर पठाण टोळीवाले अफगाण व भारतीय प्रदेशांत शिरून लुटालूट करीत, बायकामुलें व गुरेंढोरें पळवून नेत. त्यांच्या बंदोबस्ताकरितां सरहद्द प्रांताच्या सीमेवर मोक्याच्या ठिकाणीं लहान लहान शिबंदीचीं ठाणीं असत. प्रत्येक ठाण्यांत आजूबाजूच्या मुलखाची नीट टेहेळणी करता यावी म्हणून एक उंच बुरूज असे. या ठाण्यांतील बुरुजाबुरुजावरून निशाणें फिर

आरशाच्या साहाय्याने संदेश पाठविण्याची व्यवस्था असे. डोळ्यांत तेल घालून पहारा करावा लागे. कारण टोळीवाले अत्यंत कावेबाज, धाडसी व क्रूर होते. सरहद्दीच्या थोड्या मागे छावण्या असत.

ह्या भारताच्या वायव्य सीमेवर सारागढी नांवाचें एक छोटें ठाणें होतें. १८९७ सालच्या सप्टेंबर महिन्यांत सारागढीमध्ये एकवीस शीख सैनिकांची तुकडी होती. त्यांपैकी बहुतेक सर्वजण नव्याने भरती झालेले व अजून लढाईचा अनुभव नसलेले एकोणीस-वीस वर्षांचे युवक होते. त्यांच्यांतील दोघेजणच जुने, मुरलेले शिपाई होते. एक हवालदार ईशरसिंग व दुसरा सिग्नलर गुरुमुखसिंग. ह्या साली सरहद्दीवरील टोळीवाल्यांनी उठाव केला होता. ह्या टोळीवाल्यांच्या लढाऊ जमावास लष्कर असें म्हणतात. एके दिवशीं सायंकाळीं हजारों पठाण टोळीवाल्यांनी सारागढीला वेढा घातला. तिथून पूर्वेस कांही अंतरावर लॉकहार्ट व गुलिस्तान हीं दुसरीं दोन ठाणीं होतीं. नवीन कुमक मागविण्यांत आली होती. ती येईपर्यंत हें ठाणें लढविणें आवश्यक होतें. रात्रीच्या अंधारांत सारागढींतील एकवीस सैनिक शत्रूची फळी फोडून मागील ठाण्यावर जाऊं शकले असते. पण कर्नलसाहेबांनी हुकूम दिला होता, की ' शेवटचा मनुष्य असेपर्यंत गढी लढवलीच पाहिजे." शक्य तितक्या लवकर कुमक पाठविण्याचें आश्वासन कर्नलसाहेबांनी दिलें होतें. तोपर्यंत संदेशद्वारा " मी गढी लढवीन " असें हवालदार ईशरसिंगाने कर्नलसाहेबांना वचन दिलें.

रात्रभर टोळीवाले गढीवर गोळीबार करीत होते. पण

तील सैनिक त्यांना पुरेपूर उत्तर देऊं शकत नव्हते. कारण त्यांचा दारूगोळ्याचा सांठा मर्यादित होता. अंधारात शत्रु स्पष्ट दिसत नव्हता. म्हणून गोळ्या वाया न घालविता प्रत्येक गोळीला हमखास बळी घेण्याची खात्री असल्यासच गोळी झाडावी असा आदेश हवालदार ईशरसिंगाने दिला. तरुण संत्री तटावरून डोळ्यात तेल घालून पहारा देऊं लागले. ईशरसिंगाने सर्वांना गुरु गोविंदसिंगाच्या शिकवणीची आठवण देऊन त्याचें धैर्य कायम राखलें. मरायचें तर शत्रूचा घाव छातीवर घेऊन मरूं, पण पाठ दाखवून कधीहि माघार घेणार नाही, असा निश्चय त्यांनी केला.

पहाट झाली. डोंगर दिसूं लागले. आजूबाजूच्या डोंगरावर हजारों टोळीवाले दिसूं लागले. दारूगोळा कमी पडत होता. बुरजावर चढून आरशाच्या साहाय्याने गुरुमुखसिंगाने पलीकडील लॉकहार्ट ठाण्यावर संदेश पाठविला, "आम्ही तीस तास लढत आहों, पण दारूगोळा कमी पडत आहे. कृपा करून लवकर कुमक व दारूगोळा पाठवा." लॉकहार्टहून कर्नलसाहेबानी उलट संदेश दिला, "सभोंवतालच्या सर्व प्रदेशात टोळीवाले पसरले आहेत. कुमक व दारूगोळा पाठविणें शक्य नाही. पण तुम्ही माघारीं मोडता कामा नये शेवटपर्यंत लढा दिलाच पाहिजे." गुरुमुखसिंगाने हवालदार ईशरसिंगास संदेश कळविला. ईशरसिंगाने उलट संदेश पाठविण्यास सांगितलें, "आपण निश्चिंत असा, शेवटपर्यंत गढी लढवूं."

थोडें उजाडल्यावर टोळीवाल्यांनी गढीवर हल्ला चढविला.

ईशरसिंगाने हुकूम दिला, "गोळ्या वांया घालवूं नका, शत्रू जवळ आल्यावर त्यांचे म्होरके टिपून काढा." हजारों टोळीवाल्यांनी गढीवर गोळीबार सुरू केला. नवशिके जवानहि मुरब्बी सैनिकाप्रमाणे शांतपणे लढत होते. टप्प्यांत येईल त्याला ते टिपीत होते. सहा तास अविरत गोळीबार चालू होता. मरून पडलेल्या टोळीवाल्यांचीं दोनशें प्रेतें ईशरसिंगाने मोजलीं. पण एकविसांपैकीं आता फक्त सातच जवान उरले होते. त्यांपैकी प्रत्यक्ष लढण्यास सहाच शिल्लक होते. कारण गुरुमुखसिंगाला बुरुजावर उभें राहून सारखे संदेश पाठवावे लागत होते. सहा-सात हजार टोळीवाल्यांनी आता गढीला वेढा घातला होता. सहा विरुद्ध सहा हजार! पण ते सहा शीख सिंहासारखे होते. ईशरसिंग त्यांना म्हणाला, "सहा हजाराची काय क्षिति बाळगतां तुम्ही! गुरु गोविंदसिंगाचें वचन लक्षांत ठेवा—

चिडियों तो मैं बाज तुडाऊँ<br>
सवा लाखसे एक लडाऊँ<br>
तबै गोविंदसिंग नाम धराऊँ

एक शीख सव्वा लाखाशीं मुकाबला करूं शकतो, हें ध्यानांत ठेवा. आपण शेवटपर्यंत लढूं."

ह्या प्रतिकाराने टोळीवाले थक्क झाले. मध्याह्न उलटून गेली. टोळीवाल्यांना वाटलें, की जर सायंकाळपर्यंत गढी घेतली नाही तर ब्रिटिश व हिंदी सैनिकाची कुमक येऊन पोचेल व सारागढी घेतां येणार नाही. गढीच्या आजूबाजूस वाळलेलीं झुडपें होतीं.

ह्या झुडपांना चारी बाजूंनी टोळीवाल्यांनी आग लावून दिली. सर्वत्र धूर पसरला. धुरांतून पलीकडील शत्रु दिसेना. मग टोळीवाल्यांनी बाजांवर दोन दोन फूट जाडीचे चिखलाचे थर घातले व त्या बाजा ढालीसारख्या पुढे करून ते तटाजवळ येऊं लागले. गढींतील सैनिकांनी गोळ्या झाडल्या तर त्या बाजांवरील चिखलांत रुततील व वांया जातील असा त्यांचा हिशोब होता. अनेक टोळीवाले बाजांच्या आश्रयाने तटाच्या पायथ्यापाशीं पोचले. त्यांनी ठाण्यावर हल्ला चढवला. ईशरसिंगाने गुरुमुखसिंगाद्वारा लॉकहार्टला संदेश पाठविला, की "दारूगोळा संपला आहे व आता फक्त सात जण उरलों आहोंत." कर्नलसाहेबांचें उत्तर आलें, "नाइलाज आहे; पण शेवटच्या शिपायापर्यंत लढत राहा." गुरुमुखसिंग संदेश पाठविण्याकरिता उंच बुरुजावर उभा राहिला. टोळीवाले आता तटावर चढले. एका कोपऱ्यांत शिपंद्यांचें भोजनघर होतें. ईशरसिंग व उरलेल्या पांच जवानांनी तिथे शेवटचा सामना करण्याचें ठरवलें. दारूगोळा संपलाच होता. तरीहि टोळीवाले ह्या महा नरसिंहांना भीत होते. त्यांनी जळतीं लांकडें भोजन गृहावर फेकलीं. भोजनघर पेटलें. आंत राहिल्यास भाजून मरण्याची भीति होती. हवालदार ईशरसिंग व त्याच्या पांच जवानांनी बंदुकीवर संगिनी चढविल्या व जाळींतून बाहेर पडणाऱ्या वाघांप्रमाणे त्यांनी शत्रूवर चाल केली. सहाहि जन लढतां लढतां मरून गेले. पण मरतां मरतां त्यांनी अनेक शत्रूंनाहि मारलें. आता बुरुजावर फक्त गुरुमुखसिंग उरला होता. त्याने

शेवटचा संदेश पाठविला व संदेश पाठविण्याचें काम बंद करण्याची परवानगी मागितली. गुरुमुखसिंगाने शांतपणें तिवईवरील आरसा काढला, तो पेटींत बंद केला व त्यानेहि आपल्या बंदुकीवर संगीन चढवली. पण तो खाली आल्यास आणखी कांही लोकांना मारील अशी भीति वाटून टोळीवाल्यांनी बुरुजालाच आग लावून दिली. गुरुमुखसिंगाला बाहेर येतां येईना. सतीचें वाण घेणाऱ्या जुन्या राजपूत स्त्रियांप्रमाणे उफाळत्या ज्वाळांत तो जळून भस्म झाला. पण मरण्यापूर्वी त्याने केलेल्या सत्श्रीअकालच्या घोषणेनें आजूबाजूचे पहाड निनादून गेले.

भारतीय सेनेच्या इतिहासांत सारागढीच्या शीख सैनिकांचा पराक्रम सोनेरी अक्षरांत कायम लिहिलेला राहील. त्यांच्या अमर दिव्याची कथा अमृतसरमधील गुरुद्वारावर रेखांकित केली आहे. ती आजहि पाहायला मिळते. अजूनहि पंजाब पलटणीला या सारागढी दिनाची सुट्टी मिळते.



# करणबहाद्दुर राणा

ही पहिल्या महायुद्धातील वीरकथा आहे. पहिल्या महायुद्धात सुरुवातीला जर्मनांच्या जबरदस्त हल्ल्यापुढे अँग्लो–फ्रेंच फौजांना माघार घ्यावी लागली. तेव्हा दोस्तांची फळी सावरण्याकरिता भारतीय सेनेच्या अनेक पलटणी युरोपात पाठविण्यात आल्या. त्यांत करणबहादुराची पलटण होती. बहादुरांच्या हिंदी पलटणींनी जर्मनांचा रेटा थोपवून धरला व दोस्तांची फळी सावरली. युद्धाच्या अखेरपर्यंत या भारतीय पलटणी फ्रान्समध्येच राहिल्या.

१९१८ च्या वसंत ऋतूंत जर्मनांनी आपला शेवटचा

निर्वाणीचा हल्ला सुरू केला. पहिल्या धडाक्यात त्यांनी दोस्त फौजांना बरेंच मागे हटवलें. फिरून फळी सावरण्याकरिता काही हिंदी पलटणी जर्मन हल्ल्याच्या विभागात पाठविण्यात आल्या. त्यात करणबहादुराची पलटण होती.

दोस्त फौजांनी जर्मन लोंढा थोपविण्याकरिता प्रतिहल्ला सुरू केला. त्यात अग्रभागी २।३ गुरखा पलटणी होत्या. पहिल्या महायुद्धात खदकी लढाईला प्राधान्य होतें. एक जर्मन मशिनगन गुरखा पलटणीवर परिणामकारक मारगिरी करीत होती. ही मशिनगन बंद पाडणें आवश्यक होतें. त्याकरिता अनेक अधिकाऱ्यांनी व सैनिकांनी प्रयत्न केले. पण यश मिळण्याऐवजी जर्मन मशिनगनला अनेक अधिकारी व गुरखा सैनिक बळी पडले. तेव्हां करणबहादूर आणखी थोड्या गुरखा सैनिकांनिशीं ही मशिनगन नष्ट करण्याकरिता निघाला.

करणबहादुराने लुईसगन बरोबर घेतली होती. खदकांतून बाहेर पडून शत्रूच्या गोळीबाराची पर्वा न करता करणबहादुर आणि त्याचे साथीदार तोफांच्या मारगिरीमुळे निर्माण झालेल्या खड्ड्यांतून रांगत खुरडत पुढे निघाले. लुईसगन चालवायला तीन माणसें असतात. शत्रूच्या खदकाच्या जवळ गेल्यावर करणबहादुराने व त्याच्या बरोबरच्या जवानांनी आपली लुईसगन चालू केली. पण दुसऱ्याच क्षणीं गन चालवणारा सैनिक जर्मन गोळीबाराला बळी पडला. एका क्षणाचाहि विलंब न लावता करणबहादुराने गनवर पडलेल्या आपल्या मृत गुरखा बांधवाला बाजूला लोटून

गन चालवायला सुरवात केली. गन सुरू होतांच जर्मनांचें लक्ष तिच्याकडे वेधलें. उजव्या व डाव्या दोन्ही बाजूंनी जर्मनांनी गोळीबार सुरू केला. जर्मन खंदकांतून जर्मन सैनिक हातबॉंब फेकूं लागले. त्याचे छिलके सगळीकडे उडत होते. पण करण-बहादुर गन चालवीतच राहिला. अचूक मारगिरी करून जर्मन मशिनगन चालविणाऱ्या चारी सैनिकांना त्याने ठार केलें. जर्मन मशिनगन बंद पडली. आता त्याने आपलें लक्ष जर्मन खंदकांतून हातबॉंब फेकणाऱ्यांकडे वळविलें. पण एवढ्यांत एकाएकीं मशिनगन बंद पडली. त्यांत तांत्रिक दोष निर्माण झाला होता. गन बंद पडलेली पाहून जर्मन खंदकातून करणबहादुरावर गोळ्यांचा वर्षाव करण्यात येऊं लागला. करणबहादुराने शांतपणे तांत्रिक दोष दूर केला व फिरून लुईसगन सुरू केली. आणखी थोड्या वेळाने फिरून गन नादुरुस्त झाली. फिरून करणबहादुराने ती दुरुस्त केली. त्याच्या मारगिरीमुळे जर्मन सैनिकांना खंदकांतून होर्री वर करतां येईनात.

तासामागून तास निघून चालले; पण करणबहादुराची मारगिरी चालूच राहिली. एवढ्यांत जर्मन फौजेला कुमक येऊन पोचली. जर्मनांनी नवा हल्ला सुरू केला तेव्हा त्या विभागात माघार घेण्याचें ठरविण्यांत आलें. लढाईत शिस्तबद्ध माघार घेणें अत्यंत अवघड असतें. यशस्वी माघार घेण्यात नेतृत्वाची कसोटी असते. माघार घेताना नीतिधैर्य खचतें. ही पळापळ सुरू होते व पळणाऱ्या सैन्याची हाडगेतोड होते. पण करण-

बहादूराच्या विभागातील पल्टणीने अयत यशस्वी रीत्या माघार घेतली मुख्य फौज माघार घेत असताना थोडे कणखर व कडवे सैनिक शत्रूला थोपवून धरण्याकरिता मागे ठेवण्यात येतात. ते आपल्या अचूक मारगिरीने शत्रूला थोपवून धरून आपल्या सैन्याला सुरक्षितपणे पिछाडीकडाल नियोजित ठिकाणी पोचू देण्यात मदत करतात

मुख्य सैन्य माघार घेऊ लागले पुढे येणा या शत्रूच्या लोंढ्याला थोपविण्याची कामगिरी करणबहादूरावर सोपविण्यात आली जमन सैन्य खंदकातून बाहेर पडले ते पुढे येऊ लागले, पण करण बहादूराने व त्याच्यासारख्याच मागे ठेवलेल्या तुकड्यानी अचूक व अविरत मारगिरी करून जर्मन प्रगतीला खीळ घातली पहिली ओळ करणबहादूराच्या तुकडीच्या अगदी जवळ येईपर्यंत करण बहादुर गन चालवीतच राहिला मग विद्युद्गतीने दोन तीनशे पावले माघार घेऊन त्याने फिरून जर्मनावर गोळीबार सुरू केला परत शत्रूची गति मदावली अशा रीतीने एकसारखे लढत राहून व जर्मन प्रगतीला एकसारखी खीळ घालून आपल्या पलटणीची पिछाडी त्याने सुरक्षित ठेवली मुख्य पलटण इच्छित स्थळी पोचली तेव्हा करणबहादुर परत आला करणबहादुर खरोखरच कर्णा सारखा लढला करणबहादुरासारखे वीर सैनिक जोपर्यंत भारतीय फौजेत आहेत, तोपर्यंत तिच्या प्रतिष्ठेला व लौकिकाला कोणीच धक्का लावू शकणार नाही



## रिचपाल राम

सुभेदार रिचपाल राम हे सहाव्या राजपुताना रायफल्सच्या चौथ्या पलटणींत होते. दुसरें महायुद्ध सुरू होतांच अनेक हिंदी पलटणी मध्यपूर्वेंत पाठविण्यात आल्या. आफ्रिकेंतील इटाली-च्यास प्रदेशात १९४०–४१ च्या थंडीच्या मोसमांत ब्रिटिशांनी मोठी चढाई केली. केरेनचा किल्ला हें एक महत्त्वाचें ठाणें होतें. त्याच्या दुर्गमतेचें वर्णन इतत्र आलेंच आहे. ह्या दुर्गम पहाडी किल्ल्यावर ज्या भारतीय पलटणींनी हल्ला केला, त्यांत सुभेदार रिचपाल राम यांची पलटण होती.

फेब्रुवारी महिन्यांत केरेनवर मोठी चढाई करण्यांत आली. युद्धाची धुमश्चक्री चालू असतांना सुभेदार रिचपाल रामांच्या कंपनीचे (सुमारें १५० सैनिक) ब्रिटिश अधिकारी जखमी झाल्यामुळे कंपनीचें नेतृत्व सुभेदार रिचपाल रामाकडे आलें. रिचपाल रामानी आपल्या कंपनीच्या तीस तीस माणसांच्या तुकड्या बनविल्या. डोंगराच्या उतारावरील एक महत्त्वाची जागा जिंकण्याचें काम रिचपाल रामाच्या कंपनीकडे सोपविण्यांत आलें होतें. निवडक तीस जवान बरोबर घेऊन सुभेदार रिचपाल राम यानी हल्ला चढविला. वरून व दोन्ही बाजूंनी शत्रूने जोरदार मारगिरी केली. पण जिवाची तमा न धरता, वाटेंत कोठेंहि न थांबता, धडाक्यासरशीं संगीनहल्ला चढवून ती महत्त्वाची जागा सुभेदारसाहेबानी जिंकली.

पण शत्रु स्वस्थ बसला नाही. शत्रूची मारगिरी इतकी अचूक व परिणामकारक होती, की बाकीच्या तुकड्या त्याच्या मदतीस वर येऊं शकल्या नाहीत. शत्रूच्याहि दृष्टीने ती जागा महत्त्वाची होती. गेलेली जागा परत मिळविण्याकरिता शत्रूने प्रतिहल्लचाला सुरवात केली. सुभेदारसाहेब व त्याचे तीस जवान एकाकी पडले होते. पण ते वीर राजपूत डगमगले नाहीत. दगड, खडक व खड्डयाचा आसरा घेऊन ते प्रतिहल्लचाला तोंड देत होते. पहिला हल्ला त्यानी परतवून लावला. पण शत्रूहि जिद्दीस पेटला होता. मध्यरात्रीपासून पहाटेपर्यंत शत्रूने एकामागोमाग एक असे सहा प्रतिहल्ले चढविले. वीर राजपुतांनी ते सहाहि हल्ले परतवले. पण

आता त्यांचा सर्व दारूगोळा संपून गेला होता. दारूगोळ्याशिवाय लढणें अशक्य होतें. म्हणून पहाटेपूर्वीच्या अंधारात हातीं आलेली जागा सोडून सुभेदार रिचपाल राम आपल्या उरलेल्या सैनिकां सह खालीं आले.

आपणास जागा सोडावी लागली याची रुखरुख सुभेदार-साहेबाच्या मनाला लागून राहिली होती. पाच दिवसानंतर अधिक तयारी करून फिरून हल्ला करण्याचें ठरलें. सुभेदारसाहेब एकेक दिवस मोजीत होते. सहाव्या दिवशीं सोडावी लागलेली जागा पुन्हा जिंकण्याच्या ईर्षेने रिचपाल रामाच्या कंपनीने फिरून हल्ला चढविला. आपल्या सैनिकांच्या अग्रभागीं राहून त्याना प्रोत्साहन देत तोफा व उखळी तोफा यांच्या गडगडाटात त्यांनी हल्ला चढविला. चढण कठीण होती. शत्रूची मारगिरी जबरदस्त होती. पण रिचपाल राम व त्याचे शूर सैनिक निश्चयाने पुढे पावलें टाकीत होते जागा जवळ आली. इतक्यात उखळी तोफेचा एक गोळा सुभेदारसाहेबाच्या पायापाशींच फुटला. दुसऱ्याच क्षणीं त्यांचा उजवा पाय तुटून दूर उडाला. भळभळा रक्त वाहू लागलें. इतक्यात कांहीं गोळ्या त्यांच्या शरीरात शिरल्या. सुभेदारसाहेब जमिनीवर कोसळले. पण त्याना आता युद्धाचा कैफ चढला होता. ते जमिनीवर डाव्या कोपरावर अर्धवट बसून आपल्या सैनिकाना उत्तेजन देत होते " आगे बढो, जवान आगे बढो, मर्दोंके बच्चे ! लडते रहो। पहाडरी चोटीपर कब्जा होनाही चाहिये।" त्यांच्या शब्दानी उत्तेजित होऊन गेले

राजपूत सैनिक सुभेदारसाहेबांचा बदला घेण्याकरिता त्वेषाने शत्रू-वर तुटून पडले. डोंगराचा माथा राजपुतांनी जिंकला ; पण सुभेदार रिचपाल राम कामास आले. राजपुतांचा केसरिया भाणा त्यांनी राखला. त्याना मरणोत्तर 'व्हिक्टोरिया क्रॉस' बहाल करण्यांत आला.





# कमलरामाची कमाल

पंजाबातील शेतकऱ्यांना जाट म्हणतात. जाट शेतकरी अत्यंत काटक व कष्टाळू असतो. जाट सैनिकांनी दोन्ही महायुद्धांत मोठी कामगिरी बजावली आहे. कमलराम हा उंचापुरा जाट तरुण होता. भारतीय फौजेत व्हिक्टोरिया क्रॉस मिळवणारा हा सर्वांत तरुण सैनिक होय. केवळ विसाव्या वर्षी कमलरामाला भारतीय फौजेतील अत्युच्च मानाचे पदक प्राप्त झाले.

शिपाई कमलराम आठव्या पंजाब रेजिमेंटच्या तिसऱ्या पलटणीत एक साधा सैनिक होता. कमलरामाची पलटण दुसऱ्या महायुद्धात इटलीत पाठविण्यात आली होती. ब्रिटिश व अमेरिकन

फौजाचा रोख रोमवर होता. त्याना रोखून धरण्याकरिता जर्मनानी रोमच्या दक्षिणेस सुमारें सवर मैलावर इटलीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रचंड आणि अभेद्य मोर्चेबंदी केली होती. किल्लेबंदी बांधण्यांत जगप्रसिद्ध असलेल्या जर्मन 'टोट' इंजिनियर पथकाने ही मोर्चेबंदी बांधली होती. सर्व मुलुख डोंगराळ होता. ह्या डोंगराचा फायदा घेऊन जर्मनानी अत्यंत कुशलतेने ह्या किल्लेबंदीची रचना केली होती. ह्या किल्लेबंदीतील अत्यंत महत्त्वाचें ठाणें 'कॅसीनो' नावाच्या डोंगरावर होतें. डोंगराच्या उतारावर तोफा व मशिनगन्सचीं घरटीं बनविण्यात आलीं होतीं. कॅसीनो टेकडीच्या पायथ्याजवळून 'गारी' नावाची नदी वाहात होती. नदीच्या पलीकडे व कॅसीनो डोंगराच्या पश्चिम बाजूनें रोमला जाणारा रस्ता होता. नदी ओलांडून रस्ता गाठण्याचें काम पंजाब पलटणीकडे सोपविण्यात आलें होतें.

मे महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात दोस्त फौजाचा निर्णयात्मक हल्ला सुरू झाला. पहाटेपूर्वी हजार तोफा धडाडूं लागल्या. सूर्योदयाच्या किंचित् आधी अडीच हजार विमानानी सर्व किल्लेबंदीवर प्रचंड बॉबवर्षाव केला विमानें निघून जाताच पायदळाचा हल्ला सुरू झाला. कमलरामाच्या पलटणीने गारी नदी ओलांडली. नदीच्या पलीकडील चढणीवर जर्मनांच्या थोड्या थोड्या अंतरावर चार मशिनगन्स होत्या. त्याच्या माऱ्यामुळे पंजाब पलटणीला पुढे हालता येईना. मशिनगन्स नष्ट केल्याशिवाय आगेकूच करणें शक्य

नव्हतें पण ह्या आगींत पुढे जायला कोण तयार होणार? कमलरामाच्या कंपनीकमांडरने विचारलें, "दुष्मनच्या मशिनगन्स दस्त करायला कोण तयार आहे?" तात्काळ कमलराम अधि का याच्या पुढे उभा राहिला तो म्हणाला, 'साब, मैं जाऊँगा।" आणखीहि काही सैनिक आपणहून पुढे आले

कमलराम हातात रायफल व कमरेला हातबॉंब लावून निघाला त्याच्या मागणीप्रमाणे कंपनीतील बाकीच्या सैनिकानी जर्मनाचें ल क्ष वेधून घेण्याकरिता त्याच्यावर गोळ्याचा भडिमार सुरू केला कमलराम अडाणी शेतकरी असला तरी तो समयसूचक होता त्याने विचार केला, की सरळ चाल करून गेल्यास शत्रु आपणास टिपून मारील म्हणून कमलराम सरळ न जाता प्रथम एका बाजूस बराच दूरवर चालत गेला एका उतवट्याचा त्याने फायदा घेतला आता जमिनीवर पालथा पडून तो रांगत पुढे निघाला मधून मधून शत्रूच्या गोळ्या येत होत्या पण उतवट्यामुळे कमलरामाचा हालचाल शत्रूला दिसत नव्हती वाटेंत शत्रूने काटेरी तारा लावल्या होत्या कमलरामाच्या एका हातात तार तोडण्याचें आडकित्त्यासारखें हत्यार होतें त्याने तार तोडली तारेमागून तार तो पार करीत गेला तार संपली आता मोकळी जागा होती आता तो जर्मनाच्या बगलेवर होता. त्याचा कंपनीकमांडर दुर्बिणीतून त्याची प्रत्येक हालचाल उत्सुकतेने पाहात होता कमलरामाच्या यशावर आगेकूच अवलंबून होतें कंपनीकमांडरने कमलरामाच्या उजव्या बाजूस असलेल्या जर्मन मशिनगन्सवर

मुद्दाम मारागिरीची झोड उठविली. त्यामुळे जर्मनांचें लक्ष दुसऱ्या बाजूस वेधलें.

कमलराम रांगत, खुरडत चालला होता. चाहूल लागली तर आपली धडगत नाही हें तो जाणून होता. बिलकूल आवाज न करतां तो जर्मनांच्या मशिनगनच्या मोर्चाजवळ येऊन पोंचला. त्याने बंदूक स्थिर केली. बंदुकींतून गोळी उडाली. दुसऱ्या क्षणीं मशिनगन चालवणारा जर्मन सैनिक खाली कोसळला. त्याच्या सहकारी सैनिकाने वळून पाहिलें. कमलराम आता मोर्चाच्या कांठावर होता. दुसऱ्या जर्मनाला वेळ मिळाला तर तो आपल्या-वर गोळी चालवील हें जाणून कमलरामाने आपल्या संगीन लावलेल्या रायफलसह त्या दुसऱ्या जर्मन सैनिकावर झेप घेतली. संगीन जर्मनाच्या छाताडांतून आरपार गेली. कमलरामाने संगीन उपसली. इतक्यांत पलीकडच्या खंदकांतून कमलरामावर पिस्तूल रोखून एक जर्मन अधिकारी धावत येत होता. क्षणाचाहि विचार न करता कमलरामाने गोळी चालवली. जर्मन ऑफिसर ठार झाला. एक मशिनगन बंद पडली. पण अजून तीन शिल्लक उरल्या होत्या.

कमलराम फिरून रांगत दुसऱ्या मशिनगनच्या मोर्चाकडे वळला. मांजराच्या पावलांनी तो मोर्चाजवळ येऊन पोचला. मशिनगनवाल्यांचें लक्ष त्याच्याकडे वळण्याच्या आंतच कमलरामाची बंदूक दोनदा कडाडली. प्रत्येक गोळीने आपला बळी घेतला. मशिनगनर व त्याचा साहाय्यक ठार झाले. दुसरी मशिनगन बंद पडली. कमलरामाला आणखीच जोर चढला. तो फिरून रांगत

तिसऱ्या मोर्चाकडे वळला. पण तिथे बरेच जर्मन सैनिक होते. म्हणून कमलरामाने बंदुकीऐवजीं हातबॉंब वापरण्याचें ठरविलें. एकामागून एक त्याने हातबॉंब मोर्चात फेकले. आपणास इजा होऊ नये म्हणून तो जमिनीसपाट पडून राहिला. बरेच जर्मन मृत वा जखमी झाले. त्यांची पाचावर धारण बसली. शस्त्रें टाकून हात वर करून ते शरण आले. त्याना आपल्या बंदुकीच्या धाकात त्याने हिंदी पलटणीच्या रोखाने रवाना केलें.

पण अजून एक मोर्चा शिल्लक होता कमलरामाच्या मागून एक हवालदार काही सैनिकासह तिथे येऊन पोचला. कमलराम आता त्याच्यात सामील झाला. आपल्या बंदुकीच्या माऱ्याने त्याने जर्मनास मोर्चाबाहेर तोंड काढूं दिलें नाही. मग चौथ्याहि मोर्च्याचा निकाल लागला. हिंदी पलटणीच्या मार्गातील अडथळा दूर झाला पलटण पुढे चालूं लागली कमलरामाने शौर्याची कमाल करून पलटणीचा मार्ग मोकळा केला व हत्यारी पलटण ही यशाची धनी झाली येता येता वाटेंत एका घरात काही जर्मन शिपाई कमलरामाला दिसले. घरात घुसून त्याने एका जर्मनाला ठार केलें दुसरे दोघे त्याला शरण आले. त्याना कैद करून तो छाती वर काढून परत आला. सर्वांनी त्याचें कौतुक केलें. आज त्याच्या छातीवर ' व्हिक्टोरिया क्रॉस ' रुळत आहे



# प्रेमंद्रसिंग भगत

गेल्या महायुद्धात भारतीय फौजेंत पहिला व्हिक्टोरिया क्रॉस मिळविण्याचा मान सेकंड लेफ्टनंट प्रेमद्रसिंग भगत ह्यांना मिळाला. सध्या प्रेमद्रसिंग भगत ब्रिगेडियर आहेत खडकी येथील बॉम्बे इंजिनियर ग्रुपचे ते काही वर्षे कमांडर होते

गेलें महायुद्ध सुरू झालें तेव्हा इटली आफ्रिकेंतील ब्रिटिश मुलखावर हल्ला करील अशी भीति होती. म्हणून हिंदी फौजेच्या अनेक तुकड्या आफ्रिकेत पाठविण्यात आल्या. १९४०–४१ च्या हिंवाळ्यात जनरल वेव्हेल ह्यांच्या नेतृत्वाखालीं आफ्रिकेंतील सर्व इटालियन मुलखात ब्रिटिशांनीं चढाया केल्या. १९३५

साली इटलीने काही तरी खुसपट काढून एथिओपिया हा देश गिळंकृत केला. तेथील बादशहा हेले सेलासी यानी इंग्लंडमध्ये आसरा घेतला. इटली युद्धात पडताच हेले सेलासींच्या प्रजेने इटलीविरुद्ध उठाव केला. त्याला पूरक म्हणून ब्रिटिश व हिंदी फौजाहि एथिओपियात पाठविण्यात आल्या.

भारतीय व ब्रिटिश फौजानी इटालियन फौजेचा पराभव केल्यावर इटालियन फौज गोंडराच्या रोखाने माघार घेऊ लागली. हिंदी पलटणींनी त्याचा पाठलाग करण्यास सुरुवात केली. मार्ग डोंगरातून होता. हिंदी व ब्रिटिश फौजानी आपला पाठलाग करू नये म्हणून इटालियन फौजेने माघार घेताना गोंडरच्या रस्त्यावर दूरपर्यंत भुईसुरुंग पेरून ठेवले. हे भुई सुरुंग म्हणजे जमिनींत पेरलेले बॉबच असतात अनेक वेळा ते तारानी एकमेकाना जोडलेले असतात. ह्या तारावर किंवा बॉबवर पाऊल ठेवलें की बॉबचा स्फोट होतो मोटारींच्या चाकाच्या वजनानेहि त्याचा स्फोट होतो. हे बॉब शोधून काढून ते निकामी करून टाकल्याशिवाय सैन्य पुढे जाणें शक्य नसतें. ह्या बॉबना माईन्स असेंहि म्हणतात अनेक तऱ्हेच्या माईन्स असतात प्रत्येकाची उडण्याची पद्धत वेगळी असते. ते काढताना व निकामी करताना स्फोट होण्याची भीति असते हे भुईसुरुंग शोधून काढून त्याना निकामी करण्याचें काम इंजिनियर पलटणीकडे असतें. तें काम करणारे लोक तज्ज्ञ असावे लागतात तळहातावर शिर घेऊनच हें काम करावें लागतें

गोंडारचा रस्ता भुईसुरुंगानी अडलेला पाहून बॉबे इंजिनियर

सुरुंग पथक अडथळा दूर करण्याकरिता बोलविण्यात आलें. त्या पथकाचे प्रेमेंद्रसिंग भगत हे अधिकारी होते. अकॅडमींतील अभ्यास क्रम पुरा करून वर्षहि लोटलें नव्हतें. अशा या एकवीस वर्षांच्या तरुणावर ही अवघड कामगिरी सोपविण्यात आली. हसतमुखानें त्याने ती कामगिरी स्वीकारली. इटालियन सुरुंगाची तंत्रपद्धति कळल्याशिवाय हे सुरुंग काढणें शक्य नव्हतें. तरुण्या प्रेमेंद्रसिंगानें इटालियन सुरुंगपद्धतीचा सूक्ष्म अभ्यास केला होता. अठ्ठेचाळीस तासपर्यंत तहानभूक विसरून क्षणभरहि झोप न घेता प्रेमेंद्रसिंग हें जोखमीचें काम करीत राहिले. ते व त्याचे लोक प्रथम सुरुंग पेरलेल्या रस्त्याकडे आपल्या ब्रेनकॅरीयरमधून जात होते. त्यांचा ब्रेन-कॅरियर एका सुरुंगावरून गेल्यामुळे प्रचंड स्फोट झाला. कॅरियर उडाला. आत बसलेले अनेक जवान मृत्यु पावले व जखमी झाले. प्रेमेंद्रसिंगहि बाहेर फेकले गेले. पण सुदैवाने त्याना जखम झाली नाही. त्यानी लगेच सुरुंग काढण्यास सुरवात केली. त्यानी हें काम सुरू केलेलें पाहताच मुद्दाम मागे ठेवलेल्या इटालियन तुकड्यानी त्याच्यावर गोळीबार सुरू केला. पथकांतील काही लोकाना गोळीबाराला प्रत्युत्तर देण्याचें व शत्रूचें लक्ष दुसरीकडे वेधण्याचें काम देऊन प्रेमेंद्रसिंगानी संयमपणें काम चालू ठेवलें. सुरुंग शोधून काढून ते एकामागून एक निकामी करीत चालले. इतक्यात त्याच्या उजव्या बाजूला जवळच इटालियन तोफेचा गोळा फुटला. त्याच्या धडाक्यामुळे त्याच्या उजव्या कानाचा आतील पडदा फाटला. आणखी थोडी वेळाने डाव्या बाजूला दुसरा स्फोट होऊन दुसरा

कान निकामी झाला. त्याना आता काही एक ऐकूं येत नव्हतें. एकसारखें वाकून काम केल्यामुळे पाठ, पाय, कंबर व हात दुखूं लागले. वरच्या अधिकाऱ्यांनी त्याची ही स्थिति पाहून त्याना मागे बोलाविलें. पण त्यानी मागे जाण्यास नकार दिला. ते तसेच काम करीत राहिले. मध्येच सुरुंग संपले असें वाटून ते दुसऱ्या कॅरियरमध्ये बसून पुढे निघाले. पण काही यार्ड जातात न जातात, तोंच कॅरियरखाली दुसऱ्या सुरुंगाचा स्फोट झाला. फिरून भगत बाहेर फेकले गेले. फिरून नवीन सुरुंगक्षेत्र सुरू झालें होतें. तासामागून तास. शत्रूच्या गोळीबारात त्यानी काम चालूच ठेवलें. पंचावन्न मैल रस्त्यावर हे सुरुंग पेरले होते. वाटेंत पंधरा ठिकाणीं सुरुंग पेरले होते. पंधराहि ठिकाणचे सुरुंग त्यानी काढले. पण आता ते इतके थकले होते की, त्याना उभेंहि राहवेना. पण त्याच्या चेहऱ्यावर कामगिरी पार पाडल्याचें समाधान दिसून येत होतें. मनुष्य पाचदहा मिनिटें, एक दोन तास धैर्याने संकटाला तोंड देऊं शकतो. परंतु प्रत्येक क्षणाला मृत्यूला तोंड देत, कोणत्या क्षणीं वेगळ्या धर्तीचा सुरुंग उडेल ह्याची भीति असताना, सतत अठ्ठेचाळीस तास इतक्या निर्धाराने व इतक्या बेडरपणे काम केल्याचें जगातील हें एकमेवच उदाहरण असेल. अशा माणसाला मृत्यु भिईल नाही तर काय? वरिष्ठ अधिकाऱ्यानी सेनाकार्यालयाकडे वृत्तात पाठविताना खालील शब्द वापरले होते. " the longest continual feat of sheer cold, courage — " नीडर धैर्याची अखंड कामगिरी हे शब्द

खरोखरच सार्थ होते. प्रेमेंद्रसिंगाच्या कामगिरीमुळे शत्रूला फिरून पाय रोवून उभें राहण्याची संधीच मिळाली नाहीं. त्यामुळे इटालियन फौजेचा पूर्ण मोड झाला. हजारों इटालियन सैनिक ब्रिटिश व भारतीय पथकांनी कैद केले. ह्याचें श्रेय सर्वस्वी प्रेमेंद्रसिंगाच्या बहादुरीलाच दिलें पाहिजे.

ते तेथून परत आल्यावर १९४२ सालीं पुण्याच्या महाराष्ट्रीय मंडळाने त्याचा मोठा सत्कार करून त्यांना चांदीची तलवार बक्षीम दिली.



# गाजे घाले

हवालदार गाजे घाले पाचव्या शाही गुरखा रेजिमेंटच्या दुसऱ्या पलटणींत हवालदार होते (2/5 Royal Gurkhas). १९४३ च्या मे महिन्यात हिंदी तुकड्या ब्रह्मदेशातील चीन डोंगरांत कामगिरीवर पाठविण्यात आल्या होत्या. चीन डोंगर मालिकेंत जपान्यानी मजबूत मोर्चेबंदी केली होती. ह्या मोर्चेबंदीच्या अलीकडे काही अंतरावर एक टेकडी होती. त्या टेकडीवर जपान्याचें टेहेळणीपथक होतें. तिथून भारतीय फौजेच्या सर्व हालचाली दिसत. शिवाय ती टेकडी जपानी मोर्चेबंदीची किल्लीच होती. त्या टेकडीवरून जपानी मोर्चेबंदीवर भडिमार करतां येत होता. म्हणून ती टेकडी जिंकून घेणें आवश्यक होतें. ही टेकडी घेण्याचें काम गुरखा पलटणीच्या एका कंपनीवर (सुमारे २०० सैनिक) सोपविण्यांत आलें. ह्या कंपनीतील एका प्लॅटूनचे मुख्याधिकारी

हवालदार गाजे घाले होते कंपनीच्या अधिकाऱ्याने गाजे घालेंच्या प्लॅटूनवर ( सुमारें ४० सैनिक ) पहिला हल्ला चढविण्याची कामगिरी सोपविली

ह्या महत्त्वाच्या टेकडीवर जाण्यास एकच रस्ता होता. टेकडी पासून एक डोंगराची सोंड निघाली होती ह्या सोंडेवरून जाऊनच टेकडीवर हल्ला करणें शक्य होतें इतर बाजूचे मार्ग रोखलेले होते सोंड खडकाळ होती त्याच्या उतारावर झाडेंझुडपेंहि नव्हतीं सोंडेवर आलेला मनुष्य शत्रूच्या गोळीबाराच्या टप्प्यात येई हें काम अत्यंत धोक्याचें होतें परंतु गाजे घालेने तें आनंदाने स्वीकारलें

सोंडेच्या पायथ्याशीं त्यांनी आपले जवान एकत्रित केले त्यांना आपला बेत समजावून सांगितला पण जपान्यांच्या ते दृष्टीस पडले जपान्यांनी तावडतोब त्यांच्यावर गोळीबार सुरू केला आपल्या जवानांना माऱ्याच्या टप्प्यातून हवालदारसाहेबांनी थोडें बाजूला नेलें व डोंगरकड्याचा आसरा घेऊन हिमालयातील डोंगरकपारीवर चढण्याचा सराव असलेल्या गुरख्यांनी हळूहळू पुढे जाण्यास सुरवात केली

आता ते सोंडेच्या टोकाशीं आले सोंडेवर अनेक ठिकाणीं जपान्यांना खंदक खणले होते त्या खंदकांतून जपानी, गुरखा तुकडीवर गोळीबार करूं लागले हवालदाराच्या इशाऱ्यासरशीं सैनिक भुईसपाट झाले कमरेच्या कुकऱ्या उपसून त्यांना तोंडात धरल्या एक एक इंच ते पुढे सरकूं लागले पहिला खंदक आला

जपान्यांनी मारगिरीचा कहर केला. गाजे घालेने ठरलेला इशारा केल्याबरोबर आपल्याजवळील हातबाँब त्यांनी खंदकात फेकले व दुसऱ्या क्षणीं हातबाँबचे स्फोट थाबतात न थाबतात तोंच गुरख्यानी तोंडातल्या कुकऱ्या हातात घेऊन खंदकांत उड्या मारल्या. सपासप कुकऱ्या चालूं लागल्या. सर्व जपानी गारद झाले. एक खंदक सर झाला. दुसऱ्या क्षणीं हवालदारसाहेबाच्या इशाऱ्याबरोबर गुरखे पुढे निघाले.

पुन्हा मागल्या खंदकातून जपान्यानी गोळीबार सुरू केला. गाजे घाले उभा राहून आपल्या सैनिकाना मार्गदर्शन करीत होता. इतक्यात एक जपानी हातबाँब त्याच्याजवळ फुटला. त्याचे तुकडे त्याच्या हातात, छातींत व पायात शिरले. पण आता गाजे घाले युद्धमदिरेने धुंद झाला होता. त्याला कशाचेंहि भान उरलें नव्हतें. गुरखा भाषेंत तो गरजला, " आयो गुरखाली, आयो गुरखाली. " ह्या घोषणेबरोबर अंगात नवचैतन्य संचारून गुरखे पुढल्या खंदकातील शत्रूवर तुटून पडले. कोणीतरी त्याना सुचवलें, " तुमच्या जखमा बाधून या. " हवालदारसाहेब म्हणाले, " नाही, नाही. प्रथम शत्रूचा निपात ! मगच मलमपट्टी. " त्याचे सर्व कपडे रक्ताने भरलेले होते. एका हातात कुकरी तळपत होती. कुकरी आता रक्ताने माखली होती. हवालदाराचे डोळे आता रक्ताप्रमाणे लाल झाले होते. ते पुन्हा गरजले, " आयो गुरखाली "—सर्व गुरखे बेभान झाले. कुकऱ्या शत्रूच्या नरडीचा घोट घेऊं लागल्या. सर्वत्र जपान्याचीं प्रेतें दिसूं लागलीं. दुसरेहि गुरखा सैनिक बर

येत होते. "आयो गुरखाली"च्या निनादाने आकाश भारावून गेलें. हल्ल्यामागून हल्ला चढवीत गुरखे पुढेच चालत राहिले. टेकडी ताब्यांत आली. सर्वजण आता थकले होते. त्यांचे वरिष्ठ अधिकारी तिथे येऊन पोचले. त्यांनी त्यांची पाठ थोपटली व त्यांना सक्तीने डॉक्टरकडे मलमपट्टी करायला पाठविलें. ह्या अतुल शौर्याबद्दल हवालदार गाजे घालेला व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आला.



# प्रकाशसिंग

गेल्या महायुद्धात ब्रह्मी आघाडीवर घडलेली ही घटना आहे ब्रिटिश व भारतीय फौजांनी १९४३ च्या अखेरीस मायू द्वीपकल्पात चढाई केली। सुरुवात केली आदल्या दोन वर्षांच्या पराभवाचा परंपरा आता संपली होती जपान्यांचें जंगली व डोंगरी युद्धाचें तंत्र हिंदी सैनिकांनीं आत्मसात् केलें होतें मायू द्वीपकल्पाच्या टोकास डॉनब्रईक हे महत्त्वाचें ठाण होतें तिथे जपान्यांनी मजबूत मोर्चेबंदी केली होती मुख्य सैन्याच्या पुढे शत्रूची टेहेळणी करण्याकरिता हलक्या जातीचे पण द्रुत गतीचे रणगाडे वापरण्यात

येतात. त्यांना ब्रेनकॅरियर्स म्हणतात. जपानी मोर्चेबंदी जवळ येताच अनेक कॅरियर्स जपानी मोर्चेबंदीची चांचणी करण्याकरिता पुढे धाडण्यात आले. हे ब्रेनकॅरियर्स उघडे असतात ब्रेनकॅरियर्स जवळ येताच जपान्यांनी त्याच्यावर जोरदार उखळी तोफांचा व मशिनगन्सचा मारा सुरू केला. अगदी पुढे जे दोन कॅरियर्स होते ते जपानी उखळी तोफांनी जायबंदी केले. ते निकामी झाले आतल्या सैनिकांजवळचा दारूगोळा संपला. हे दोन कॅरियर्स इतर कॅरियर्सपेक्षा बरेच पुढे होते. हे पाहून मोर्चातून बाहेर निघून जपानी सैनिकांनी त्यातील दारूगोळा संपल्यामुळे असहाय्य बनलेल्या सैनिकांवर हल्ला चढवला. हवालदार प्रकाशसिंगाचा कॅरियर बराच मागे होता. जपानी मारगिरीमुळे मागले कॅरियर्स थबकले होते. पण आपले सैनिकबंधू संकटात पाहून प्रकाशसिंगाने आपला कॅरियर बेधडक पुढे हाकला. आगीच्या वर्षावाची फिकीर न करता तो निकामी कॅरियर्सजवळ येऊ लागला. मोर्चातून बाहेर पडलेले जपानी सैनिक बंद पडलेल्या कॅरियर्सपासून थोड्या अंतरावर होते प्रकाशसिंगाने आपल्या ब्रेन गनचा मारा त्याच्यावर सुरू केला. त्याबरोबर जपानी सैनिक फिरून खंदकात माघारी परतले. काही वार्तेतच प्रकाशसिंगाच्या ब्रेन गनला बळी पडले. मग प्रकाशसिंगाने बंद पडलेल्या कॅरियरमधील सैनिकांना आपल्या कॅरियरमधून परत आणले.

आणखी थोडे दिवस गेले. डॉन-बाईक ठाण्याच्या जवळच समुद्र आहे. हा समुद्रकिनारा जपानी तोफांच्या व मशिनगन्सच्या

मान्याच्या टप्प्यांत होता. या मधल्या किनारपट्टींतून जपानी मोर्चाच्या बगलेवर हल्ला करण्यास कांही ब्रेन कॅरियर्स एके दिवशीं धाडण्यांत आले. पण जपान्यांच्या मारगिरीमुळे ह्या किनाऱ्यावर तीन कॅरियर्स बंद पडले. एका कॅरियरमध्ये त्यांतील सैनिक गोळ्या चुकवण्याकरिता अंग चोरून दबून बसले. दुसऱ्या एका कॅरियर मधील सैनिक पहिल्या कॅरियरच्या आडोशास लपून बसले. उखळी तोफांचे गोळे आल्यास ते सर्वचजण गारद झाले असते. शिवाय तिसऱ्या बंद पडलेल्या कॅरियरमध्ये असहाय स्थितींत दोन जखमी सैनिक पडून राहिले होते. जपान्यांची मारागिरी चालूच होती. थोड्याच वेळांत उखळी तोफा त्या सर्वांचे बळी घेणार असें वाटूं लागलें पण हें पाहून हवालदार प्रकाशसिंगाला स्वस्थ बसवेना. संपूर्ण बेफिकिरीनें त्याने आपला कॅरियर निकामी कॅरियरच्या रोखाने चालवला. त्या कॅरियर्सजवळ पोचून त्यांतील हत्यारें, त्याचप्रमाणे दोन्ही कॅरियरसमधील सैनिकांना तो सुखरूप घेऊन परत आला. मोठ्या बहाद्दुरीची गोष्ट होती ही. पण अजून एका कॅरियरमध्ये दोन जखमी सैनिक पडले होते, त्यांचे जीव धोक्यात होते. फिरून एकदा प्रकाशसिंगाचा कॅरियर धडाडत तिसऱ्या निकामी कॅरियरजवळ येऊन पोचला. जखमी शिपायाला उचलणें कठीण होतें. प्रकाशसिंगाने आपला कॅरियर शांतपणें निकामी कॅरियरपुढे उभा केला. मग कॅरियरमधून खाली उतरून आंतील साखळी बाहेर काढून ती त्याने निकामी कॅरियरला बांधली. मग फिरून स्वतःच्या कॅरियरमध्ये बसून जणू

काय पुण्यातील वरातीची मोटर चालविणाऱ्या ड्रायव्हरप्रमाणे निकामी कॅरियरसह तो परत फिरला. जपानी व भारतीय सैनिक ही अजब करामत पाहातच राहिले. सर्वांनी आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. प्रकाशसिंगाच्या पलटणींतील त्याचे सैनिकबंधु अक्षरशः त्याला डोक्यावर घेउन नाचले. प्रकाशसिंगाच्या या असीम धैर्याबद्दल त्याला व्हिक्टोरिया क्रॉस देण्यात आला.





# भनभक्त गुरुंग

१९४५ सालीं ब्रिटिश व भारतीय फौजांनी ब्रह्मदेशाच्या पश्चिम किनाऱ्यावर आगेकूच करण्यास सुरुवात केली. छत्रीधारी सैनिक उतरून किनाऱ्याजवळील रामरी बेट जिंकण्यांत आलें. रामरी बेटाच्या ईशान्येला किनाऱ्यावरून दक्षिणेकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर जपान्यांचें टमाँहू येथे ठाणें होतें. या ठाण्याच्या शेजारींच स्नोडन ईस्ट नांवाची टेकडी होती. टेकडी जपान्यांच्या ताब्यांत होती. टेकडीच्या उतारावर खंदक खणून व गुहा बनवून जपान्यांनी मोर्चेबंदी केली होती. या टेकडीवरून टमाँहूजवळचा

मुख्य रस्ता जपान्यानी रोखून धरला होता. टेकडीवरून रस्त्यावर अचूक गोळीबार करता येत होता म्हणून रस्ता खुला करण्याकरिता ही टेकडी जिंकून घेणे आवश्यक होतें हें काम दुसऱ्या गुरखा रायफल रेजिमेंटच्या तिसऱ्या पल्टणीकडे सोपविण्यात आलें होतें (३।२ गुरखा रायफल्स). या पल्टणीच्या एका तुकडीत रायफल्मन मनभक्त गुरुंग होता. रायफल पल्टणींतील शिपायाला शिपाई म्हणण्याऐवजी रायफल्मन असें म्हणतात.

मनभक्ताची तुकडी पुढे जाऊ लागली, तों त्याच्यातील एकेक शिपाई पटापट पडू लागला नेम त्यांनी अचूक होती. तुकडी थबकली ती एका आडोशाआड लपली मनभक्त आजूबाजूची टेहेळणी करू लागला त्याची गरुडदृष्टि त्याच्या जागेपासून सुमारें दोन अडीचशे पावलांवर असलेल्या एका झाडावर खिळली. झाडाच्या वरच्या फांदीवर त्याला हालचाल दिसली थोडा वेळ आणखी निरखून पाहिल्यावर झाडाच्या फांदीवर एक जपानी शिपाई बसलेला त्याला दिसला. लढाईच्या वेळीं अचूक नेम मारणाऱ्या शिपायांना शत्रूचीं माणसं टिपून मारण्याकरिता नेमण्यात येतें त्यांना स्नायपर (Snaper) असें म्हणतात. आपलीं माणसं टिपून का मारलीं जात आहेत हे मनभक्ताच्या लक्षात आले मनभक्तहि नेमबाजींत हुशार होता तो शांतपणें उभा राहिला व अचूक नेम धरून त्याने गोळी झाडली. झाडावरून जपानी शिपाई कोसळला.

मनभक्ताची तुकडी फिरून पुढे सरकू लागली जपान्यानी

गोळ्यांचा भडिमार सुरू केला. फिरून तुकडीला थांबणें भाग पडलें. मनभक्त फिरून समोरची बाजू न्याहाळूं लागला. टेकडीच्या खालच्या उतारावर जपान्यांचे चार छोटे खंदक दिसले. त्यांतून जपानी शिपाई मारागिरी करीत होते. हुकुमाची वाट न पाहतां मनभक्त एका दगडाआडून दुसऱ्या दगडाआड असा आसरा घेत पुढे सरकूं लागला. त्याची थोडीशी हालचाल दिसतांच जपानी त्याच्या रोखाने शेकडों गोळ्या झाडीत. पण मनभक्त लगेच दुसऱ्या दगडाचा आडोसा घेई. आता एक खंदक त्याच्या हातबाँबच्या टप्प्यांत आला होता. त्यांत दोन जपानी शिपाई होते. त्याने हातबाँबची सेफ्टी पिन काढली, मनांत तीन आकडे मोजले व हातबाँब अचूक जपानी खंदकांत फेकला. हवेंत अर्धवलय घेऊन बाँब खंदकांत घुसला व दुसऱ्याच क्षणीं त्याचा स्फोट झाला. आंतील दोन्ही जपानी सैनिक ठार झाले. ह्या गडबडीत मनभक्ताने शेजारच्या जपानी खंदकांत उडी मारली व आंतील जपान्यांना त्याने संगिनीने भोसकलें. तिसऱ्या खंदकांत त्याने आता दुसरा हातबाँब टाकला. धडाड्धूम होऊन स्फोट झाला. आंतील जपानी सैनिक ठार झाले. मग पलीकडील चौथ्या खंदकांत उडी मारून त्याने त्यांतील सैनिकांसहि सफा केलें.

आणखी थोड्या अंतरावर जपान्यांनी टेकडीच्या उतारावर गुहेसारखी फट करून त्यांत मशिनगन बसवली होती. त्यांतील जपान्यांना मनभक्त दिसत नव्हता. त्याचा फायदा घेऊन तो गुहेच्या जवळ गेला. मग आपल्याजवळील धूम्रबाँब काढून त्याने

तो गुहेंत फेकला. ह्या बॉबमुळे अतोनात धूर होऊन जीव गुदमरून जातो. धुरामुळे प्राण कासावीस होऊन उघड्या हवेंत येण्याकरिता दोन जपानी बाहेर आले ते अजून गोंधळलेल्याच मन स्थितींत होते. क्षणात भनभक्ताची कुकरी बाहेर निघाली व दोनच घावात दोन्ही जपान्याना त्याने यमसदनाला पोचविलें पण अजून मशिनगन चालवणारा आतच होता. भनभक्त रागत गुहेंत शिरला व मशिनगनरला त्याने परलोक दाखविला.

इतक्यात जपान्यानी प्रतिहल्ला सुरू केला. भनभक्ताने खूण करून आपल्या तुकडींतील इतर लोकाना पुढे बोलाविलें. मग थोड्याच क्षणापूर्वी, जपान्याच्या ताब्यात असलेल्या खदकाचा आसरा घेऊन, त्याने शत्रूचा प्रतिहल्ला थोपवून धरला व काही वेळाने त्याना मागे परतवून लावलें. भनभक्ताच्या ह्या भीम पराक्रमाबद्दल त्याला व्हिक्टोरिया क्रॉस देण्यात आला.



# नामदेव जाधव

गेल्या महायुद्धात मराठा रेजिमेंटच्या पहिल्या पलटणीने मोठी बहादुरी करून आपल्या पल्टणीला मिळालेलें "जगी पल्टण म्हणजेच लढाऊ पलटण" हें नाव सार्थ केलें या पलटणींतील शिपाई नामदेव जाधव याला १९४५ च्या एप्रिल महिन्यात वीरत्वाचें सर्वोच्च व्हिक्टोरिया क्रॉस हें पदक मिळालें १९६१ सालच्या डिसेंबरमधील गोवा मोहिमेंतहि ह्या पलटणीने पोर्तुगी जाचा प्रतिकार मोडून दमणचें ठाणें सहा तासात जिंकून घेतलें

गेल्या महायुद्धात मराठा रेजिमेंटची पहिली पल्टण मध्यपूर्वेत व नतर इटलींत पाठविण्यात आली १९४५ च्या एप्रिल महिन्यात

ब्रिटिश, अमेरिकन व हिंदी फौजानी उत्तर इटलीमधील सानिओ नदीवरील जर्मन मोर्चेबदी फोडून शेवटचा मोठा हल्ला केला व जर्मनाची लाडगेतोड करून त्याना शरण येण्यास भाग पाडले

जर्मनानी सीनिओ नदीच्या उत्तर तीरावर मोर्चेबदी केली होती ही जर्मनाची शेवटची फळी होता ब्रिटिश फार्जेत पहिली मराठा पलटण ही सर्वात आघाडीवर होती व सीनिओ नदी ओलाडून पैलतीरावरील जर्मन मोर्चेबदी तोडण्याची कामगिरी या ' जगी पलटणी 'वर सोपविण्यात आली हल्ला पहाटे सुरू झाला प्रथम बराच वेळ दोस्ताच्या तोफानी पैलतीरावर तोफाचा भडिमार केला त्यानतर विमानानी बॉबवर्षाव केला विमानें निघून जाताच मराठा पलटणीच आघाडीचें पथक नदी ओलाडू लागलें हें पाहताच जर्मनानी उखळी तोफाचा व मशिनगनचा जोरदार मारा सुरू केला मराठा शिपायानी " शिवाजीमहाराज की जय ", असा घोष करीत नदी पार करण्यास सुरुवात केली शत्रूच्या गोळ्यामुळे मराठा सैनिक जायबदी व मृत होऊन खाली पडू लागले काही प्रवाहात पडून वाहून गेले पण मर्द मराठे तसेच पुढे घुसत राहिले जर्मनाची मारागिरी वाढू लागली त्याच्या गोळ्या मराठ्याचे बळी घेत होते पण मागे पाऊल घेण्यास कोणी तयार नव्हते अधिकारी व हुद्देदार एकसारखे म्हणत होते, " आगे बढो, जवान, आगे बढो " शिवाजीमहाराजाचें नाव घेतलें की मराठ्याच्या अगात नव्या बळाचा सचार होई काही शिपायानी पाणी ओलाडले ते पैलतीर चढू लागले कपनीकमाडर, नामदेव जाधव व काही

थोडे शिपाई पलीकडच्या काठावर पोचले, तोंच एका गोळीस कंपनीकमांडर बळी पडला. आता मारागिरी इतकी जबरदस्त होती, की नामदेवाशिवाय पैलतीराला पोचलेले सर्व सैनिक मृत किंवा जखमी झाले होते. नामदेव जाधवाने एका उथळ खड्ड्याचा आश्रय घेतला. त्याच्या शेजारी कांही जखमी मराठा सैनिक पडले होते. गोळ्यांचा पाऊस पडत होता. जखमी शिपाई तिथेच पडून राहिले तर ते शत्रूच्या गोळ्यांस निश्चित बळी पडतील, हें नामदेवाने ओळखलें. स्वत:चा जीव वाचविण्याची कल्पनाहि त्याच्या मनाला शिवली नाही. आपल्या सोबत्यांकरिता त्याचा जीव तिळतिळ तुटत होता. त्याने मनाशीं निश्चय केला, एका जखमी सैनिकाला आपल्या पाठीवर उचलून घेतलें व गोळ्यांची तमा न धरतां त्याला सुरक्षित ठिकाणीं नेऊन ठेवलें. वाटेंत जर्मनांनी सुरुंग पेरले होते. त्यांचीहि त्याने पर्वा केली नाही. तो फिरून परत गेला. दुसऱ्या सवंगड्याला त्याने उचललें व त्याला सुरक्षित स्थळीं पोचवलें. परत येऊन पाहातो तों आणखी एक जखमी शिपाई दिसला. तिसऱ्याहि सैनिकाला उचलून त्याने सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवलें व स्वत:ची चामडी वचावण्याचा यत्किंचितहि प्रयत्न न करतां त्याने फिरून पैलतीर गांठलें.

किनाऱ्यावरून एक जर्मन मशिनगन पैलतीरावरील मराठा सैनिकांवर गोळीबार करीत होती. नामदेवाजवळ स्वयंचलित बंदूक होती. गोळ्यांच्या वर्षावांत रांगत जवळ जाऊन त्याने आपल्या स्वयंचलित बंदुकीने ( Tommy Gun ) तिन्ही जर्मनांस ठार केलें

व मशिनगन बंद पाडली. एवढ्यांत त्याच्या उजव्या हाताला गोळीची जखम झाली. आता त्याला टॉमी गन चालवितां येईना. पैलतीरावर भुतासारखा एकटाच नामदेव उरला होता. पण तो गांगरला नाही, बावरला नाही. आणखी दोन मोर्चांमधून जर्मन मारगिरी करीत होते. नामदेव रांगत, खुरडत जवळ गेला. जवळच्या हातबाँबने त्याने पहिला मोर्चा साफ केला. फिरून खुरडत उरलेल्या मोर्चाजवळ जाऊन त्यांतहि त्याने हातबाँब टाकले. मोर्चातील जर्मन ठार झाले. अलीकडील तीरावर मराठा सैनिक व अधिकारी विस्फारित नेत्रांनी नामदेवाची कामगिरी पाहत होते. नामदेव आता उभा राहिला. त्याने पैलतीरावरील पलटणीस पुढे येण्याची खूण केली. शेकडों मराठा कंठांतून गगनभेदी आरोळ्या उठल्या, "शिवाजीमहाराज की जय! हरहर महादेव!" हरणासारख्या उड्या मारीत मराठ्यांनी पैलतीर गांठला व ते शत्रूवर तुटून पडले. जर्मन फळी फुटली. लढाईचा रंग पालटला. दोस्त फौजा पुढे घुमूं लागल्या आणि ह्या जयाचें सर्व श्रेय एका मर्द मराठ्यास, नामदेव जाधवास, मिळालें. त्याला व्हिक्टोरिया क्रॉस मिळाला.

नामदेवाच्या मर्दुमकीबद्दल त्याला बढती मिळाली. तो जमादार होऊन आता सेवानिवृत्त झाला आहे. तो नगर जिल्ह्यांतील आहे. पुण्यांतील चतु:शृंगीजवळ मुख्यतः मराठा पलटणींतील सेवानिवृत्त अधिकाऱ्यांनी स्थापलेल्या विजयानगर वसाहतींत एका रस्त्याला नामदेव जाधव पथ असें नांव देण्यांत आलेलें आहे.





## उमराव सिंग

ब्रिटिश–भारतीय फौजानी १९४४ साली जपानी फौजा विरुद्ध अखेरची मोहीम सुरू केली ब्रह्मदेशाच्या पश्चिम किनाऱ्या वर आराकान प्रांत आहे किनारपट्टीने भारतीय फौजा दक्षिणे कडे रंगूनच्या रोखाने आगेकूच करू लागल्या होत्या किनाऱ्यापासून सुमारें वीस मैल आत क्लादान नदीचें खोरें आहे या खोऱ्यातून जपान्यांची ठाणीं मोडून काढून पुढे चाललेल्या भारतीय सैन्याच्या तोफखानाविभागात उमरावसिंग हवालदार होता जपान्यांना काही करून रंगूनचे मार्ग रोखून धरावयाचे होते त्यासाठी जपान्यांचा प्रतिकार अधिकाधिक वाढू लागला

कलादानचें खोरें जगलव्याप्त आहे. दोन्ही बाजूच्या आराकान डोंगराच्या प्रचड रागामधून कलादान नदी वाहते डागराचे उतार व नदीचें खोरें जगलव्याप्त आहे. हें जगल इतकें घनदाट आहे, की रस्त्यापासून दहा पधरा फुटाच्या पलीकडे काही दिसत नाही रस्त्याच्या बाजूला झुडपें व वेल इतके दाट असतात, की त्यात लपून बसलेला मनुष्यच काय, पण हत्तीसुद्धा दिसून येणार नाही हाम, मुग्या व जळवाचा उपद्रव भयकर असतो. जपानी जगलयुद्धात तरबेज होते हवालदार उमरावसिंगाच्या पथकावर जगलातून लपून छपून येऊन जपान्यांनी हल्ला सुरू केला.

जगलात शत्रु कोठें आहे, त्याची सख्या काय आहे, तो कोणत्या दिशेने हल्ला करील, हें सांगता येत नाही. जपान्यांची सख्या जास्त होती ते दिसत नव्हते. चारी बाजूनी गोळ्या मात्र येत होत्या उमरावसिंगाच्या पथकातील जखमी व मृतांची सख्या वाढू लागली आता आपण हल्ला केल्यास हिंदी तुकडीला आपण सहज चिरडून टाकू असें वाटून जंगलातून बाहेर पडून भयानक आरोळ्या ठोकीत जपानी उमरावसिंगाच्या पथकावर तुटून पडले. पण उमरावसिंगाने आपल्या छोट्या तुकडीचें नेतृत्व इतक्या कुशलतेने केलें, की जपान्यांचा हल्ला त्यांनी मोडून काढला. जपान्यानी जगलांत माघार घेतली, पण गोळीबार मात्र चालूच ठेवला दहा पधरा मिनिटानतर फिरून, "बॉन झॉय" च्या आरोळ्या ठोकीत जपानी सैनिक भारतीय तुकडीवर तुटून पडले ते जवळ येऊ लागले. आता ते हातघाईंवर येऊ लागले. एका हात

बॉबचा तुकडा उमरावसिंगाच्या शरीरांत घुसला. पण उमरावसिंग विचलित झाला नाही. नेतृत्व करायला दुसरें कोणीहि नाही हें त्याला माहीत होतें. आपण हातपाय गाळले तर इतर सैनिकहि बेहिम्मत होतील, हें त्याला माहीत होतें. म्हणून स्वतःच्या जखमेची पर्वा न करतां तो आपल्या जवानांना प्रोत्साहन देऊं लागला. मूठभर हिंदी सैनिकांनी जिद्दीनें लढून दुसराहि हल्ला परतवून लावला.

जपान्यांनी फिरून जंगलाचा आसरा घेतला. मूठभर हिंदी सैनिकांनी आपला हल्ला मोडून काढला, म्हणून त्यांना आता चीड आली होती. आणखी थोडा वेळ जाऊं दिल्यावर जपान्यांनी फिरून तिसरा हल्ला केला. आणखी एका हातबॉंबचा तुकडा उमरावसिंगाच्या शरिरांत घुसला. सर्व शरीर रक्तानें भरलें तरी उमरावसिंग आपल्या सैनिकांना उत्तेजन देतच राहिला. फिरून उमरावसिंगाच्या नेतृत्वाखाली भारतीय सैनिकांनी जपान्यांचा तिसरा हल्लाहि परतवून लावला. चौथ्याहि हल्ल्याची तीच गत झाली. जखमी झालेल्या जंगली जनावराप्रमाणे जपानी सैनिकांनी फिरून जंगलाचा आश्रय घेतला.

पण या चार हल्ल्यांना तोंड देतांना प्रत्येक हल्ल्यांत भारतीय सैनिकांची संख्या कमी कमी होत होती. फक्त दोन सैनिकांखेरीज इतर सैनिक मृत किंवा जखमी झाले होते. रक्तस्रावामुळे उमरावसिंगहि निःशक्त झाला होता. जुजबी मलमपट्टी लावून तो आपल्या तोफेपाशीं हत्तीच्या माहुतासारखा उभा होता.

आता जपान्यानी पाचवा हल्ला सुरू केला दोन सैनिक अनेकांशीं सामना कमा देणार! हातबॉंब फेकीत, कानठळ्या बसविणाऱ्या घोषणा करीत, संगिनी परजीत जपानी उमरावसिंगावर व त्याच्या दोन साथीदारावर तुटून पडले, बदूक चालवणें शक्य नव्हतें उमरावसिंगाने तोफेचे गनबेअरर नांवाचें अवजड हत्यार उचललें तें परजीत तो आता जपान्यांशीं मुकाबला करूं लागला त्याचा उपयोग तो• गदेसारखा करू लागला. ज्याच्या डोक्यांत त्याचा घाव बसे, तो जपानी जागच्या जागींच गतप्राण होई. जखमी झालेल्या वाघाला शिकारी कुत्र्याच्या कळपानें घेरावें, तसें जपान्यानी उमरावसिंगाला घेरलें अनेकाचे वार एकावर होऊ लागले उमरावसिंग आता बेहोश झाला होता तो कचाकच हातातील लोखडी हत्यार शत्रूवर चालवीत होता. शेवटीं तो बेशुद्ध होऊन खाली पडला

एक–दोन तासानतर मागून येणाऱ्या भारतीय पथकाने जपान्याच्या हातीं पडलेला उमरावसिंगाच्या तोफेचा मोर्चा फिरून जिंकून घेतला अनेक जपानी मारले गेले बाकीचे जगलांत अदृश्य झाले भारतीय पथकाने तोफेचा ताबा घेतला तो घेताना तोफेच्या बाजूसच पडलेला व झालेल्या असख्य जखमामुळे जवळजवळ ओळखूहि न येणारा उमरावसिंगाचा देह त्याना दिसला त्याच्या नुसत्या डोक्यावर सात जखमा झाल्या होत्या पण त्याच्या आजूबाजूला दहा मृत जपानी सैनिकाचे देह आढळून आले

उमरावसिंगाच्या शरिरांतील आत्मरूप प्रकाश त्याला सोडून गेला होता खरा; पण त्याआधी त्याने दहा शत्रूंच्या जीवनज्योती विझविल्या होत्या. या त्याच्या महान् पराक्रमाबद्दल उमराव-सिंगाला मरणोत्तर व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आला.



# अगनसिंग राय

१९४४ साली जपान्यानी हिंदुस्थानावर स्वारी करण्याची एक विराट योजना आखली होती. या योजनेला त्यानी यू योजना असें नाव दिलें होतें भारत–ब्रह्मदेशाच्या सरहद्दीवर दोस्त फौजानी आराकान, इम्फाल व हूकाँग खोरें या तीन ठिकाणीं आघाड्या उघडल्या होत्या. आराकान व इम्फाल विभागात प्रचंड हल्ला करण्याची जपान्यानी तयारी केली. ब्रह्मदेश वाचविण्याचा जपान्याचा हा शेवटचा निकराचा प्रयत्न होता. इम्फालच्या विभागात त्यानी एक लाखाहून अधिक सेना जमवली.

इम्फाल ही मणिपूरची राजधानी आहे. हें शहर चारी बाजूनी

डोंगरांनी वेढलेलें आहे. आसाम—बंगाल रेल्वेच्या दिमापूर स्टेशन-पासून निघून कोहिमामधून येणारा एकच रस्ता इम्फालला येतो. तोच इम्फालपासून खाली बिशनपूरवरून टामू व टिडीमकडे जातो. जपान्यांनी हा दळणवळणाचा मार्ग तोडून इम्फालला भारतापासून अलग करून व कोहिमा घेऊन बंगाल—आसाम रेल्वे तोडण्याचा बेत योजला होता. बंगाल—आसाम रेल्वे तुटली की हूकाँग खोऱ्यात लढणाऱ्या फौजेचें दळणवळण तुटणार होतें.

जपान्यांनी मार्च १९४४ मध्ये हा हल्ला सुरू केला. चौदाव्या सेनच्या सेनापतीने इम्फालच्या मैदानाची नाकेबंदी करून जपानी हल्ला तिथे मोडून काढून मग उलट प्रतिहल्ला करण्याची योजना आखली होती. सुरुवातीला जपान्यांना यश मिळून त्यांनी इम्फालला वेढा घातला. पण तिथे त्यांची प्रगति खुंटली. हल्यां-मागून केलेल्या हल्ल्यात जपान्यांचें अपरिमित नुकसान झालें. मग चौदाव्या सेनेने आपल्या प्रतिहल्ल्याला सुरुवात केली. बिशनपूर—सिल्चर रस्ता साफ करण्याचें काम (२।५) गुरखा पल्टणींकडे सोपविण्यांत आलें.

या रस्त्यावर जपान्यांचें मुख्य ठाणें होतें. ठाण्याची पुढील बाजू उघडी होती. जपानी उखळी तोफानी व मशिनगन्मनी सर्व रस्ते रोखून धरले होते. जपानीहि प्राणपणाने लढत होते. गुरख्यांच्या जखमी सैनिकांची संख्या वाढूं लागली.

गुरख्यांच्या एका तुकडीमध्ये अगनसिंग राय होता. जपानी मोर्चेबंदीवर हल्ला करण्याची कामगिरी त्याच्या तुकडीवर

सापळिण्यांत आली होती. हल्ला सुरू झाला. जपानी मारगिरीमुळे गुरख्यांचा मार्ग रोखला गेला. हल्ल्याचा जोर कमी पडूं लागला. एका विशिष्ट मशिनगनच्या माऱ्यामुळे आपला मार्ग रोखला जातो, हें पाहून अगनसिंगाने आपल्या तुकडींतील काही सैनिकांनिशीं, जपान्यानी केलेल्या गोळीबाराची पर्वा न करता मधल्या उघड्या जागेतून विद्युत्तेच्या वेगाने जपानी मशिनगनच्या मोर्चावर हल्ला चढविला. एका गुरख्याने मशिनगन चालविणाऱ्या चौघांपैकी एकाचा बळी घेतला. अगनसिंगाने मोर्चात उडी घेऊन उरलेल्या तिघाना आपल्या कुकरीने यमसदनाला पाठविलें.

अगनसिंगाच्या मागोमाग त्याची कंपनी त्या मोर्चापर्यंत येऊन पोचली. पण त्याचे पाय तिथे ठरेनात. कारण थोड्या अंतरावर जपानी लोक त्याच्यावर सदतीस मिलिमीटर तोफेने गोळ्याचा वर्षाव करीत होते. ही तोफ बंद पाडणें आवश्यक होतें. पहिल्या यशामुळे अगनसिंगाचा हुरूप वाढला होता फिरून आपल्या जुन्या सवगड्याना बरोबर घेऊन तो जपानी तोफेच्या मोर्चावर चाल करून गेला. कमरेपासून तो टॉमी गन उडवीत होता. पण एकाएकी त्यात बिघाड होऊन टॉमी गन चालेना. ती फेकून देऊन दुसऱ्या शिपायाच्या हातातील ब्रेन गन आपल्या हातीं घेऊन त्याने तोफेच्या मोर्चावर झेप घेतली. बंदुकीच्या एकाच फवाऱ्यात त्याने तीन गोलंदाज खलास केले. बाकीच्या गुरख्यानी आत उड्या घेऊन उरलेल्या जपान्याना खलास केलें

फिरून गुरखा पथक पुढे सरकूं लागलें. पुन्हा आणखी एका जपानी मशिनगनने त्यांना रोखलें. इजा बिजा तिजा म्हणतात, त्याप्रमाणे अगनसिंगाने तिसऱ्या जपानी मोर्चाकडे धाव घेतली. आता त्याच्या एका हातांत टॉमी गन व दुसऱ्या हातांत हातबाँब होता. तो मोर्चाच्या जवळ जाऊन पोचला. त्याने हातबाँब मोर्चात भिरकावला. त्याच्या स्फोटाने चारहि जपानी सैनिक ठार झाले. अगनसिंगाच्या या अपूर्व कामगिरीबद्दल त्याला व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आला.





## लालबहादुर थापा

गेल्या लढाईंत पहिला व्हिक्टोरिया क्रॉस मिळविणारा गुरखा वीर म्हणजे सुभेदार लालबहादूर थापा हा होय सुभेदार थापांना एप्रिल १९४३ मध्ये ट्युनिशियाच्या युद्धात व्हिक्टोरिया क्रॉस मिळाला ते १।२ गुरखा रायफलमध्ये त्या वेळीं सुभेदार होते

जर्मन सेनापति रोमेल याने उत्तर आफ्रिकेंत १९४१ व १९४२ सालीं नेत्रदीपक विजय मिळविले ४२ सालच्या ऑगस्ट महिन्यात तो ईजिप्तच्या सरहद्दीवर उभा राहिला त्याला रोखून धरतां आलें नसतें तर मध्य पूर्वेमधील युद्धाला भलतीच कलाटणी मिळाली असती याच वेळीं प्रसिद्ध आठव्या ब्रिटिश फौजेचें सेनापतित्व

जनरल मॉंटगोमेरी ( याना पुढे लॉर्ड मॉंटगोमेरी ऑफ अल् अल् अमीन असा कीताब व उमरावपद देण्यात आलें ) याना देण्यात आलें. त्यानी लढाईचें पारडें फिरविलें. रोमेलचा अंतिम हल्ला अलम् हल्फाच्या लढाईत त्यानी मोडून काढला व नंतर आपल्या प्रतिहल्लयाला सुरुवात केली. अल् अल् अमिनच्या लढाईत रोमेलचा पूर्ण मोड करून आठवी ब्रिटिश फौज आगे कूच करूं लागली. जर्मन फौजा मागे हटूं लागल्या. सिरॅनिका ऊर्फ लिबिया दोस्तांच्या ताब्यात आला. जर्मन फौजा ट्युनिशियात शेवटच्या संग्रामाकरिता उभ्या राहिल्या.

ट्युनिशियात ब्रिटिश व भारतीय फौजांचा मार्ग जर्मनानी रोखून धरला डोंगरओळीचा आसरा घेऊन त्यानी नर्वान मोर्चेबंदी उभारली. या मोर्चेबंदींत रासन्ला झौंडी इथे जर्मनांचें एक महत्त्वाचें ठाणें होतें, तें जिंकणें आवश्यक होतें. जर्मन ठाणें डोंगरावर होतें. त्याकडे जाण्याकरिता दोन छोट्या टेकाडामधून एक अरुंद रस्ता होता. जर्मन ठाण्याच्या पायथ्यापाशीं टेकाडा-मधील अंतर वाढून एक मलें मोठें मैदान बनलें होतें. या अरुंद घळींतून जाऊन वरचें जर्मन ठाणें घेण्याचें काम १।२ गुरखा रायफल्सच्या एका छोट्या तुकडीवर सोपविण्यात आलें. या हल्लयाचें नेतृत्व सुभेदार लालबहादुर थापा याचेकडे होतें. हें डोंगरावरचें ठाणें घेतलें की पुढचा मार्ग मोकळा होणार होता.

सुभेदार साहेबानी आपल्या छोट्या तुकडीचे दोन भाग करून ते रस्याच्या दोन्ही उतारावरून पुढे घेऊन [illegible]

आखली. पण तुकडी पुढे निघताच जर्मनांनी तीव्र प्रतिकाराला सुरुवात केली. त्याना अक्षरश: प्रत्येक इंच इंच आगेकरिता लढावें लागलें अनेकजण जखमी झाले. पण सुभेदार लालबहादूर आगे कूच करीतच राहिले. दीर्घ लढ्यानंतर पायथ्याजवळील मोक्याच्या जागीं ते येऊन पोचले समोरील टेकडीवरील उतारावरून जर्मनांनी लालबहादूराच्या छोट्या तुकडीवर गोळ्यांचा पाऊस पाडला. डोंगराळ प्रांतात जन्मलेले गुरखे डोंगरी लढाईत तरबेज असतात वाट नसलेले डोंगर ते पटापट चढतात. उतार, खड्डे व दगड यांचा आसरा घेत फुटाफुटानी ते डोंगर चढू लागले. गुरखे एकत्र न राहता एकमेकापासून दूर होऊन डोंगराच्या आसऱ्याने वर चढत होते. जमावावर गोळीबार करून त्याचें नुकसान करणें सहज शक्य असतें. परंतु एकेक शिपाई हुडकून काढून त्याला टिपणें कठीण काम असतें. उतारावर जे जर्मन शिपाई सापडत, त्याना गुरखे कंठस्नान घालीत. लालबहादूरानी एका हातात कुकरी व दुसऱ्या हातात पिस्तूल घेतलें. त्यानी आपल्या कुकरीने दोन जर्मनांना यमसदनाला पाठविलें. आणखी दोघांना आपल्या रिव्हॉल्व्हरने परलोकवास घडविला. गुरखे लपत छपत वर चढत होते. जर्मनांनी आता त्याची धास्ती घेतली. गुरखे पागल्यामुळे जर्मनानाहि आपले शिपाई पागवावे लागले होते जर्मन शिपाई सुद्धा पराक्रमाची पराकाष्ठा करीत होते. जर्मन व गुरखे दोघेहि एकमेकांचे बळी घेत होते जर्मनांच्या सांगिनी व गुरख्यांच्या कुकऱ्या उन्हात तळपत होत्या. दोन्ही बाजूंची प्राणहानि फार मोठी झाली. पण शेवटीं

लालबहादूदुरानी टेकडीचें पठार गाठलें. आता त्याच्याबरोबर फक्त दोनच गुरखे उरले होते वरच्या मोर्चातील जर्मनानी गुरख्याची इतकी धास्ती घेतली होती की, जेव्हा लालबहादूदुरानी शेवटच्या मोर्चावर हल्ला चढवला, तेव्हा उरलेले जर्मन मोर्चा सोडून पळून गेले. टेकडी हस्तगत झाली. टेकडी हातीं आल्यामुळे आठव्या फौजेचा मार्ग मोकळा झाला. बाकीची गुरखा पलटण डोंगराच्या पलीकडे आगेकूच करूं लागली. याचें सर्व श्रेय सुभेदार लालबहादूदुर थापा यानाच होतें. त्याना व्हिक्टोरिया क्रॉस देण्यात आला तेव्हा त्याच्या पराक्रमाचें वर्णन, "Unsurpassed bravery" अजोड पराक्रम या शब्दात करण्यात आलें होतें.





# गंगारामाचा गुंगारा

मलायातील घटना आहे ही. आज गंगाराम कर्नल आहेत. त्या वेळीं ते लेफ्टनंट होते. हिंदी सैन्यांतील एक अत्यंत शांत व धीरोदात्त अधिकारी असें गंगारामाचें वर्णन करतां येईल. काना-जवळून गोळी गेली, तरी ते विचलित होणार नाहीत. त्याची कथा आहे ही.

जानेवारी १९४२ च्या सुरुवातीस मध्य मलायांतील स्लिम नदीजवळ मोठें रणकंदन झालें. मलायांतील ब्रिटिश व भारतीय फौजांजवळ रणगाडे नव्हते, विमानें नव्हतीं, पेट्रोलचा साठा भरपूर नव्हता, शिपाई नवशिके होते. नव्या जपानी युद्धतंत्राने सर्वजण भांबावून गेले होते.

स्लिम नदीजवळ ब्रिटिश व भारतीय फौजांनी पाय रोवून शत्रूस तोंड देण्याचें ठरविलें. फौजेच्या आघाडीवरील पहिली पलटण चौथी कुमाऊँ होती. पहाटे दोनतीनच्या सुमारास कुमाऊँ पलटणीवर चोहो बाजूंनी तोफांचा भडिमार सुरू झाला. पंधराबीस मिनिटानंतर सरबत्ती थांबून रणगाड्याचा खडखडाट सुरू झाला. तीस रणगाडे धडाडत आग ओकीत पुढे येऊं लागले. टँकविरोधी तोफाहि जवळ नव्हत्या. नुसत्या पायदळाला रणगाड्यास तोंड देणें अशक्य असतें. रायफल व मशिनगन्सच्या गोळ्या टँकवर काहीहि परिणाम करूं शकत नाहीत. त्यांतच जंगलातील काही पायवाटा जपान्यांना सापडल्या. त्या वाटानी काही जपानी रणगाड्यानी पलटणीच्या बगलेवर व पिछाडीवर हल्ला चढविला. जिथे हातघाईची लढाई झाली तिथे जपान्याना भारी किंमत द्यावी लागली. पण रणगाड्यापुढे पायदळ शिपाई काय करणार ? जपान्यानी हिंदी पलटणीची लाडगेतोड केली. ह्या गडबडींत गंगाराम व दोन जवानांनी जंगलाचा आसरा घेतला.

जंगलातून दक्षिणेस शत्रूला बगल—बटसा देऊन मुख्य सैन्यास जाऊन मिळण्याचा त्याचा बेत होता. मलायातील जंगल घनदाट असतें झुडुपें व वेलामुळे पाचदहा फुटापलीकडे काहीहि दिसत नाही. संगिनींनी वेल व फांद्या तोडीत ते दिवसभर मार्ग आक्रमीत राहिले. रात्रीं जंगलात थोडीशी मोकळी जागा पाहून तिथे त्यानी थांबण्याचें ठरविलें. कारण झाडीमुळे रात्रीं दिशा कळत नव्हत्या. पण मलायातील जंगलात डासांचा उपद्रव भयंकर

असतो डासाचे थवेच्या थवे तिघाना चावू लागले काय करावें हें त्याना कळेना वेल व झुडूपें ओलीं असल्यामुळे शेकोटी पण करता येईना त्यामुळे डास त्रास पडतात शेवटीं त्या तिघानीं आपल्या अगातील कपडे एकामागून एक काढले ते फाडून त्याच्या चिंध्या करून एकेक चिंधी ते जाळू लागले धूर झाला की तेवढा काळ डासापासून बचाव होई तिघाचेहि कपडे सपले फक्त अर्ध्या चड्डया राहिल्या पायास बाधलेल्या पट्ट्याहि त्यानीं जाळल्या शेवटीं सकाळ झाली

दोन दिवस त्याना झोप नव्हती जवळ खायला नव्हतं, अगा वर वस्त्र नव्हतें गुडुपें व वेताच्या फाद्या व वेतांचे काटे ह्यानी तिघाचीं शरीरें ओरखडून निघालीं शेवटीं झाडी विरळ झाली. दुरून काही झोपड्या दिसू लागल्या ती एक रबराची बाग होती. रवरी मळ्यात बव्हशीं द मारतीय हिंदी मजूर असत त्यानी त्या तिघानाहि अन्नपाणी दिलें, त्याना कपडेहि दिले, आणि बरोबर एक दिवस पुरेल इतका शिजवलेला भात पण दिला तिघानी फिरून जगलात प्रवेश केला

पाचसहा तासाच्या वाटचालीनतर वाटेंत नदी लागली नदी खोल व प्रवाह ध रधार होता गगाराम मुख्य रस्त्याला समातर मैल दोन मैल अतरावर दक्षिणेकडे चालला होता मुख्य रस्त्यावर नदी ओलाडण्यास पूल आहे, हें त्याना माहीत होतें. म्हणून त्यानी रस्त्यावर येण्याचें ठरविलें त्यानी रस्ता गाठला ते नदीकिनाऱ्यावर आले त्यावर पूल होता पण माघार घेताना ब्रिटिश भारतीय फौजानी

तो उडविला होता. दोनतीन ठिकाणीं पुलाला खिंडारें पडलीं होतीं. पण काही फळ्या व गर्डर शाबूत होते. त्यावरून पलीकडे जाण्याचें त्यानी ठरविले. सर्वजण थकले होते. थकवा घालविण्याकरिता त्यानी आघोळ करण्याचें ठरविले. बूट काढून ठेवले ते पाण्यात उतरून आघोळ करू लागले. एवढ्यात पाच-दहा जपानी मोटारी तिथे येऊन ठेपल्या. त्यात काही जपानी सैनिक व त्यानी आपल्याबरोबर पकडून आणलेले आसपासचे मलाई, चिनी व भारतीय नागरिकहि होते. जपानी इंजिनियर पथकाची ती तुकडी होती. ते पूल दुरुस्त करायला आले होते व अनेक लोकाना त्यानी वेठीस धरून आणलें होतें. ह्या तिघाना पाण्यात पाहून जपानी सैनिकानी त्याचेवर बदुका रोखून त्याना बाहेर बोलाविलें. सुदैवाने त्याच्या अंगावर लष्करी गणवेश नव्हता. रबर मळ्यातील मद्रासी मजुरानी दिलेल्या लुंग्या होत्या. गंगाराम व त्याच्या दोघा जवानानी आपण मजूर असल्याचाच बहाणा केला. जपान्यानी त्यानाहि वेठीस धरून पूलदुरुस्तीच्या कामास जुपलें

जपान्यानी दोन्ही बाजूनी पूलदुरुस्तीस सुरवात केली गंगाराम व इतर काही मजुराना गर्डरवरून त्यानी पलीकडील तीरावर नेलें, व रस्त्यावरील खड्डे बुजविण्याकरिता त्याना दगड आणावयास लावलें. गंगारामानीं मनातल्या मनात एक योजना आखली. मजूर बरेच होते. काही वेळाने त्यानी जपान्यास आपणास हगवण लागली असून वारंवार शौचास जावें लागतें असें सांगितलें व शौचास जाण्याची परवानगी मागितली. जपान्यानी

ती दिली. गंगाराम उगीचच लांबच्या एका झुडपाआड जाऊन कांही वेळ स्वस्थ बसले. थोड्या वेळाने शौच संपवून परत आल्याचा बहाणा केला. तासाभराने फिरून शौचास जाण्याची परवानगी मागितली. फिरून पहिल्यापेक्षाहि दूरच्या झुडुपाआड जाऊन विधि उरकल्याचा बहाणा करून ते परत आले. तासभर काम केल्यानंतर फिरून तोच बहाणा त्यांनी केला. आता त्याना खरीच आव झाली आहे अशी जपान्याची खात्री पटली. संध्याकाळ होऊं लागली. तेव्हा गंगारामानी फिरून शौचास जाण्याचा बहाणा केला. पण ह्या खेपेस परत येण्याऐवजी रागत रागत त्यानी जंगल गाठलें व जंगलांत पोबारा केला. जपान्यांनी दोनचार गोळ्या झाडल्या. पण अंधारात एका मजुराला पकडायला कोण जातो, ह्या विचाराने त्यानी पाठलागाचा नाद सोडला.

रात्रभर गंगारामानी एका झाडावरील मोठ्या फांदीवर मुक्काम केला. आता फांद्या तोडण्यास त्याच्याजवळ संगीन नव्हती. म्हणून रस्त्यापासून समांतर चाळीस-पन्नास फुटावरून त्यानी मार्ग आक्रमण्यास सुरुवात केली. वाटेंत रबर मळ्यांतील भारतीय मजूर त्यांना खाण्यास देत.

दोन-तीन दिवसाच्या वाटचालीनंतर गंगाराम कुआलालंपूरला येऊन पोहोचले. हें शहर मलायन संघराज्याची राजधानी होती. पण गंगाराम तिथे पोचण्यापूर्वीच जपानी तिथे येऊन पोचले होते. पण ते नुकतेच आले होते. पूर्वी अनेक वेळा कुआलालंपूरला ते आले असल्यामुळे त्याना तेथील मसुल रस्ते माहीत होते. पण

मुख्य रस्त्याने जपान्यांची ये-जा असणार हें ओळखून ते आड-रस्त्याने चालले होते. एका आळींत त्यांनी प्रवेश केला. तोंच दुसऱ्या टोकास सायकलवरून दोन-तीन जपानी येऊन पोचले. तिथे एक बंद दुकान होतें. गंगाराम रस्त्याच्या दुसऱ्या टोकास थबकला. पण जपानी सैनिक पुढे आले नाहींत. त्यांना दुकान लुटायचें होतें. त्यांनी दुकानाचें दार फोडलें व ते आंत घुसले. जपानी अधिकाऱ्यांनी बघूं नये म्हणून त्यांनी दार फिरून आंतून लोटून घेतलें. पायीं चालण्यापेक्षा सायकलवरून प्रवास अधिक जलद व सुखकर होईल, असें गंगारामांना वाटलें. ते झपाट्याने सायकलीपाशीं येऊन पोचले. दुकानांत वस्तू पडल्याचे आवाज येत होते. दुकान मोठें होतें. जपानी सैनिक लुटींत गुंग झाले होते हें पाहून गंगारामांनी वरची सायकल उचलली व टांग मारून सायकल भरधाव हाणली.

गंगारामांनी आडरस्त्याने शहराची हद्द गाठली. तिथे एक ओढा लागला. त्यांत पाऊलभरच पाणी होतें. सायकल दोन्ही हातांनी उचलत ओढ्यांतून फर्लांग दोन फर्लांग जाऊन दक्षिणेकडे जाणारा रस्ता त्यांनी गाठला; व सायकल भरधाव सोडली. वाटेंत एका ठिकाणीं बऱ्याच अंतरापर्यंत रस्ता उडवून दिला होता. भारतीय फौजांनीच तो उडवला असला पाहिजे अशी खात्री पटून त्यांनी सायकल तिथेच टाकून फिरून पुढील मार्ग पायीं आक्रमिण्यास सुरवात केली. वाटेंत ब्रिटिश भारतीय फौजेने रस्त्यावर व त्याच्या दोन्ही बाजूंस बऱ्याच दूरपर्यंत सुरुंग पेरून

ठेवले होते पण गंगारामाचें नशिब बलवत्तर होतें कोणत्याहि सुरुंगावर त्याचें पाऊल पडलें नाही अंधार पडू लागला होता इतक्यात त्याना "Halt! Who goes there?" हे शब्द इग्रजींत ऐकू आले ते त्याच्या कानास अमृताहूनहि गोड लागले त्यानी परवलीचा शब्द दिला ( Friend ) त्याबरोबर आता हिंदींतून शब्द आले, 'दोस्त, आगे बढो!' आणखी काही पावलें पुढे जाताच सगीनधारी भारतीय सैनिक त्याना दिसला त्यानी सुटकेचा निःश्वास सोडला ते सुखरूप भारतीय छावणींत पोचले



# स्वतंत्र भारताची पहिली लढाई

तायधारची लढाई काश्मीरमध्ये झाली. काश्मीरवर टोळीवाले व पाकिस्तानी फौजांनी आक्रमण केल्यामुळे हिंदुस्थानमध्ये सामील झालेल्या काश्मीर संस्थानच्या रक्षणार्थ हिंदी फौजा पाठविण्यांत आल्या. सुरुवातीच्या हिंदी तुकड्या ह्या विमानाने पाठविण्यात आल्या. मेजर सोमनाथ शर्मानी श्रीनगर वाचविलें. त्याची वीरकथा पुढे दिलीच आहे.

दोन–तीन दिवसातच एक पुरी ब्रिगेड श्रीनगरला पोचली

तिचें नेतृत्व पैंगवरवासी ब्रिगेडियर उस्मान याचेकडे होतें. श्रीनगर खोऱ्यात वसलेलें आहे त्याच्या चारी बाजूना पर्वतराजी आहेत. त्याच्या रक्षणाकरिता या डोंगरमाथ्यावर हिंदी फौजेचे मोर्चे बांधण्यात आले पण सुरुवातीला आलेलें सैन्य इतकें तोकडें होतें की, या डोंगरावर मोर्चेबंदी केल्यावर जेमतेम चारशेंच लोक राखीव फौज म्हणून उरले ही चारशे सैनिकांची तुकडी ब्रिगेडियर उस्मान यांच्या खास हुकमतीखाली जरूर पडेल तेव्हाच वापरण्यासाठी ठेवण्यात आली होती.

श्रीनगरच्या परिसरातील नौशेरा गावच्या उत्तरेस डोंगरावर तायधार येथे एक ठाणें वसविण्यात आलें. या ठाण्यामध्ये फक्त एक प्लॅटून म्हणजे सुमार सत्तावीस लोक होते. डोंगराच्या माथ्यापाशीं खोल खंदक खणण्यात आले होते खालील (शत्रूच्या) बाजूकडील उतारावर काटेरी तारांची वेटोळीं पसरून ठेवण्यात आलीं होतीं. त्याच्याखाली पायवाटांवर सुरुंग पेरून ठेवण्यात आले होते मुख्य ठण्याच्या काही यार्ड उजव्या बाजूस एका प्रचंड वृक्षाखाली जमिनींत खंदक खणून सिमेंट कॉंक्रीटच्या मोर्चात एक मशिनगन बसविण्यात आली होती. मशिनगनच्या टप्प्यात सर्व डोंगरउतार येत होता

या ठाण्यावर एके दिवशीं पहाटे हजाराहून अधिक पठाण टोळीवाल्यांनी हल्ला केला तायधारचें ठाणें फार महत्त्वाचें होतें तें शत्रूच्या हातीं पडलें तर सर्व खोऱ्यास धोका उत्पन्न होणार होता ब्रिगेडियर उस्मान यांनी काही झाले तरी ठाणें शत्रूच्या

हातीं पडता कामा नये, असें ले्फ्टनंट कमांडरला बजाविलें होतें. हल्ला सुरू होताच त्याची खबर लेफ्टनंट कमांडरने ब्रिगेडियर-साहेबांस कळवली.

पठाणांनी मोठ्या शिस्तींत हल्ला केला. हल्ला पूर्वनियोजित व सघटित होता. काही करून ठाणें जिंकायचेंच असा जणू काय पठाणांनी निश्चयच केला होता. प्राणहानीची ते फिकीर करीत नव्हते. तायधारचें ठाणें घेतलें की लढाईचा रंग पालटणार होता. काही पठाण अक्षरशः सुरुंग पेरलेल्या जमिनीवर आडवे पडले व त्यांच्या अंगावरून मागील पठाण पुढे येऊं लागले. सहाशें यार्ड अंतरावर पठाण आले तेव्हा मोर्चातील सैनिकांनी त्यांच्यावर गोळीबार करण्यास सुरुवात केली. प्रत्येक जवान शांतपणे व सथपणे नेम धरून माणसें टिपीत होता. पठाणांनी उखळी तोफा, रायफल्स व मशिनगन्सचा मारा सुरू केला. ते हळूहळू पुढे सरकूं लागले. मोर्चातील एकेक शिपाई जखमी होऊं लागला. 'अल्ला हो अकबर'ची आरोळी ठोकून पठाणांची पहिली लाट कांटेरी तारेपाशीं येऊन पोचली. आता झाडाखालील मशिनगन तडतडूं लागली. पहिली लाट तारेपाशीं अक्षरशः कापली गेली.

तरीहि पठाण मागून पुढे येतच राहिले. दोन्ही बाजूंनी जबर-दस्त गोळागोळी होऊं लागली. गोळागोळी सुरू झाली की सैनिक बेभान होऊं लागतात. आपल्या गोळ्यांना दुष्मनाचे बळी पडूं लागले की सैनिकांस स्फुरण चढतें. तो भीति विसरून जातो. त्याच्या अंगीं रणचंडी संचारते. समोरच्या किती शत्रूंना

मारूं असें त्याला होतें. शत्रूच्या येणाऱ्या गोळ्याची तो पर्वा करीत नाही. डोंगर भागात शेकडों गोळ्या एकदम सुटूं लागल्या की त्याच्या ध्वनी आणि प्रतिध्वनींनी अवकाश निनादून जातें. जमिनीवर गोळ्या घुसतात, तिथून धूळ उडू लागते.

शत्रू समोरासमोर एकमेकाना दिसत होते. दोन्ही बाजू जिद्दीला पेटल्या होत्या माशिनगनच्या फेऱ्यात अक्षरशः शेकडों पठाण कुचलून निघत होते. पठाणाच्या गोळीबाराने मोर्चातील सैनिकांची संख्या हळूहळू कमी होऊं लागली. माशिनगनरपैकी एक जखमी झाला. पठाण अधिकाधिक जवळ येऊं लागले. सद्तीस माणसांपैकी आता मोर्चातील आठच जवान शिल्लक उरले होते. आता मदतीची जरूर होती. प्लॅटून–कमांडरने ब्रिगेडियरसाहेबाकडे कुमकेची मागणी केली.

पठाणानी एकदा काटेरी तार ओलांडली की ठाणें त्याच्या हातीं पडल्यासारखेंच होतें. आणखी नव्या पठाण टोळ्या सारख्या येत होत्या. मोर्चातील आठ व माशिनगनचे दोन असे दहा भारतीय सैनिक हजारों पठाणाना तोंड देत होते. ब्रिगेडियर-साहेबांनी राखीव तुकडींतील दोनशें सैनिकाना तत्काल तायधारच्या मोर्चाच्या कुमकेस पाठविलें. पण टाल्न वर पोचायला त्याना किमान पचवीस मिनिटें तरी लागणार होतीं. कुमक येऊन पोचेपर्यंत या पंचवीस आणीबाणीच्या मिनिटात दहा जणाना हजाराहून अधिक पठाणाना तोंड द्यायचें होतें. ब्रिगेडियर उस्मान दुर्बिणीतून दोनशें सैनिकाची तुकडी वर चढताना उत्कंठेने पाहात

होते. ते वेळेवर तिथे पोचतील का, हा खरा प्रश्न होता. दहा माणसें हजारांहून अधिक शत्रूला पंचवीस मिनिटें थोपवून धरतील का, हा खरा प्रश्न होता. युद्धाचें भवितव्य तायधारच्या ठाण्यावर अवलंबून होतें. ब्रिगेडियरसाहेबांनी रेडिओ संदेश पाठविला, " बहादुर जवानांनो, कुमक येत आहे. आपल्या जवानमर्दीची शर्थ करा. कुमक येईपर्यंत कांहीहि करून शत्रूला थोपवून धरा. या लढाईचें आणि देशाचें भवितव्य तुमच्या बहादुरीवर अवलंबून आहे. मायभूमीकरिता प्राणपणाने लढा. " संदेश पोचतांच उरलेल्या सैनिकांत नवा उत्साह संचारला. एकेकाच्या अंगांत शंभर हत्तींचें बळ आलें. निकराने प्रत्येक शिपाई अधिकाधिक गोळ्या उडवून जास्तींत जास्त पठाणांना मारण्याचा प्रयत्न करूं लागला. थरथरत्या ओठानी मशिनगनवाला दोन्ही अंगठ्यांनी मशिनगनचीं बटणें दाबून गोळ्यांचा अविरत वर्षाव करीत राहिला. पठाणांच्या आरोळ्या जवळ जवळ येऊं लागल्या. मोर्चातील आणखी पांच सैनिक जखमी झाले. फक्त तीन सैनिक उरले. पठाण तारेच्या अधिकाधिक जवळ येत होते. त्यानी तार गाठली की सर्व कारभार आटोपणार होता. मशिनगनर दात घट्ट आवळून गन चालवीत होता. पठाण तारेशीं येऊन भिडले, तोंच कुमक वर येऊन पोचली. दोनशें बंदुकींतून गोळीबार सुरू झाला. पठाणांच्या तोंडाशीं आलेला घास तोंडांत जाण्याऐवजी खाली पडला. कुमकी तुकडीबरोबर आलेल्या हाततोफा व मशिनगन्स गर्जूं लागल्या. पठाण टोळीवाले आता मागे हटले. ते उतारावरून पळूं लागले!

पळतां पळतां त्यांच्यापैकी अनेक मारले गेले. तायधारची लढाई संपली. एका ब्रॅट्रनने हजारों टोळीवाल्यांशी सामना दिला. युद्धाचा रंग पालटला. मूळ ब्रॅट्रनपैकी फक्त तीन जवान उरले होते. मशिनगनरपैकी एकच सैनिक जखमेशिवाय उरला होता. त्याच्या शांत व धीम्या धैर्यामुळेच तायधारची फत्ते झाली. शाबास त्यांच्या जवानमर्दीची आणि दिलेरी रुस्तुमीची !

ब्रिगेडियर उस्मान यांच्या डोळ्यांत आनंदाश्रू चमकले. ते उद्गारले, "स्वतंत्र भारताची पहिली लढाई आपण जिंकली. शाबास तुमची ! Well done! We have won the first battle of independence!"



# सोमनाथ शर्मा

१९४७ च्या ऑक्टोबरमध्ये पठाण टोळीवाले व पाकिस्तानी फौजा यानी काश्मीरवर आक्रमण केलें काश्मीर संस्थान भारत व पाकिस्तान या दोघांशींहि संलग्न आहे तेथील बहुसंख्य प्रजा मुसलमानधर्मीय होती, पण राज्यकर्ता हिंदु डोगरा रजपूत होता काश्मीर संस्थानाने पाकिस्तानात विलीन व्हावें म्हणून पाकिस्तान सरकारने महाराजा हरिसिंगावर खूप दडपण आणलें संस्थानांनी कोणत्या देशात सामील व्हावयाचें तें संस्थानिकांनीं ठरवायचें होतें विचार करण्यास वेळ मिळावा म्हणून महाराजा हरिसिंगाने भारत व पाकिस्तानशीं "जैसे थे" चा करार केला

त्या वेळीं काश्मीरमध्ये जाणारे मुख्य रस्ते व लोहमार्ग पाकिस्तानमधून जात असत काश्मीरवर आर्थिक दडपण आणण्याकरिता पाकिस्तानने हे दोन्ही मार्ग बंद केले पण तरीहि महाराज बधत नाहीत असें पाहून पाकिस्तान सरकारने सरहद्दीवरील पठाण टोळ्यास काश्मीरवर चढाई करण्यास चिथावून दिलें, त्याना हत्यारें पुरवलीं, मार्गदर्शनाकरिता अधिकारी दिले व टोळीवाल्याच्या मागोमाग पाकिस्तानी सैन्याच्या तुकड्याहि पाठविल्या थोडक्यात म्हणजे काश्मीर गिळंकृत करण्याकरिता पाकिस्तानने काश्मीरवर आक्रमण केलें.

काश्मीरमध्ये आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली मूठभर संस्थानी सैन्याचा टोळीवाले व पाकिस्तानी फौजा यापुढे निभाव लागेना तेव्हा महाराजानी भारतात सामील होण्याचा निर्णय घेतला भारत सरकारने त्याचा सामीलनामा स्वीकारला. त्याच क्षणीं काश्मीर भारताचा अविभाज्य भाग बनला म्हणजे टोळीवाले व पाकिस्तानी फौजाचें आक्रमण भारतीय मुलुखावर सुरू झालें. काश्मिरी फौज शौर्याने लढली, पण तिची पीछेहाट होऊ लागली शत्रु श्रीनगरच्या जवळ येऊ लागला. तेव्हा भारत सरकारने तातडीचा निर्णय घेऊन काश्मीरच्या रक्षणार्थ हिंदी फौजा पाठविण्याचें ठरविलें

पण खरा प्रश्न होता तिथे वेळेवर पोचवण्याचा. भारतातून काश्मीरात जायला एकच मुख्य रस्ता होता. त्या मार्गाने सैन्य पाठविण्यास वेळ लागला असता. म्हणून तातडीने सैन्य

नेण्याकरिता विमानाचा वापर करण्याचें ठरले. विमानदलातील व नागरी वाहतूक कंपनींतील विमानें या कामाकरिता वापरण्यात आलीं. प्रत्येक विमानातून वीस ते साठ सैनिक पाठविण्यात येऊं लागले पण आता श्रीनगरजवळील विमानतळच धोक्यात येऊ लागला होता. टोळीवाले व पाकिस्तानी तुकड्या श्रीनगरपासून थोड्या मैलावर येऊन ठेपल्या होत्या. विमानतळावर तुरळक गोळीबार होत होता. अशा परिस्थितींत चौथ्या कुमाऊँ पलटणीचे सैनिक तातडीने श्रीनगरच्या विमानतळावर उतरविण्यात आले. आघाडीच्या तुकडींचें नेतृत्व मेजर सोमनाथ शर्मा याच्याकडे होतें.

पहिल्याचं विमानातून मेजर शर्मा हे विमानतळावर उतरले. क्षणाचीहि विश्रांति घेण्यास फुरसत नव्हती सैनिक खाली उतरताच त्याच्या छोटया तुकड्या बनवून मेजर सोमनाथानी श्रीनगरकडे येणारा मुख्य रस्ता व विमानतळाच्या आजूबाजूच्या वाटा रोखून धरल्या आणखी थोडे सैनिक येऊन पोचताच त्याना घेऊन ते श्रीनगरजवळील मुख्य रस्त्यावर असलेल्या बडगाव नावाच्या खेड्यापाशीं येऊन पोचले. शत्रुसैन्याचा मुख्य रोख याच दिशेने होता. नवीन कुमक येऊन पोचेपर्यंत शत्रूला रोखून धरणें आवश्यक होतें. हें महत्त्वाचें कार्य सोमनाथ शर्मांनी बजावलें

कुमाऊँ राजपूत मूठभर होते. टोळीवाले प्रचंड संख्येने पुढे येत होते. भारतीय व टोळीवाल्याचें प्रमाण एकास सात असे होतें.

दर पंधरा-वीस मिनिटांनी विमानें खेपाखेपांनी सैनिक उतरविणार होते. किमान एक ब्रिगेड सैन्याची (सुमारें ४५००) आवश्यकता होती. ब्रिगेडियरने आपलें कार्यालय श्रीनगरला ठेवलें. आघाडीवर सोमनाथ शर्मांचे कुमाऊँ राजपूत प्राणपणाने लढत होते.

बडगावला येऊन पोचतांच मोक्याच्या जागा हेरून त्या ठिकाणीं मेजर शर्मांनी मोर्चेबंदी केली. खंदक खणून त्यांत माशिनगन्स बसविल्या, उखळी तोफांच्या जागा तयार केल्या. थोड्याच वेळांत टोळीवाल्यांच्या विनीच्या तुकड्या दिसूं लागल्या. आपल्यासमोर मूठभर सैनिक पाहून त्यांना हसूं आलें. पण लवकरच या हास्याचें परिवर्तन रडण्यांत होणार होतें, हें त्यांना ठाऊक नव्हतें. बाजी देशपांड्याने घोडखिंड लढवून शिवाजी महाराजांना रांगण्यास सुखरूप पोचूं देण्याकरिता विजापुरी सैन्यास प्राणपणाने लढून थोपवून धरलें. बरोबर तेंच कार्य विसाव्या शतकांतील हा बाजी देशपांडे करीत होता. पुरेसें सैन्य विमानतळावर उतरेपर्यंत विमानतळाचें व बडगाव रस्त्याचें रक्षण त्याला करावयाचें होतें. पुरेसें सैन्य उतरण्यास किमान सहा तास तरी लागणार होते. हे सहा तास अत्यंत महत्त्वाचे होते. कुमाऊँ सैनिक शत्रूला रोखण्यास असमर्थ ठरले असते तर काश्मीरचा कारभार आटोपलाच असता. काश्मीरचें भवितव्य या मूठभर सैनिकांवर अवलंबून होतें.

मेजर सोमनाथ शर्मांना आपल्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतावरचें हें पहिलेंच आक्रमण होते. स्वातंत्र्यरक्षणाचें कर्तृत्व आपणांत आहे, हें सिद्ध करण्याची

जबाबदारी मेजर शर्मा व त्याच्या मूठभर सैनिकावर होती. दारूगोळाहि मर्यादित होता. सोमनाथ शर्मांनी आपल्या सैनिकाना एकहि गोळी वाया न घालविण्याची सक्त ताकीद दिली. प्रत्येक गोळीला एक तरी शत्रु बळी पडलाच पाहिजे, असें त्यानी बजावलें ( Every bullet must find its billet ). बंदुकीच्या टप्प्यात शत्रु येईपर्यंत कुमाऊँ सैनिक शात राहिले. शत्रूने गोळ्याचा पाऊस पाडण्यास सुरुवात केली. आता उग्वळी तोफा धडाडूं लागल्या. शत्रुसैन्याची पहिली लाट टप्प्यात आली. हुकूम मिळाला, " Fire ". प्रत्येक शिपायाने नेम धरून गोळ्या झाडल्या. शत्रूची पहिली लाट कुमाऊँ वीराच्या खडकावर फुटली. समुद्राच्या लाटा खडकावर टकरतात. पण अभेद्य खडकाशीं टक्कर झाल्यावर त्या मागे परततात तीच स्थिति टोळीवाल्याची झाली. टोळीवाल्याच्या लाटा भारतीय मोर्चाजवळ येताच अचूक मारागिरीमुळे भारतीय सैनिकाच्या गोळ्या त्याचे बळी घेऊं लागल्या. श्रीनगरमधील सैनिक-कार्यालयात ब्रिगेडियरसाहेब विवचनेंत होते. वायरलेस टेलिफोन-वरून ते सारखे विचारत होते, ' तेथील परिस्थिति कशी आहे ? फक्त फुट्न उपयोग नाही आपल्या जीवनमरणाचा हा प्रश्न नसून आपल्या राष्ट्राच्या जीवनमरणाचा हा प्रश्न आहे. " मेजर सोमनाथानीं उत्तर दिलें, " एकहि इंच मागे हटणार नाही याची खात्री बाळगा. शेवटचा सैनिक व शेवटची गोळी उरेपर्यंत आम्ही शत्रूला पुढे येऊ देणार नाही. आम्ही प्राणाचें मोल देऊ, पण भारताच्या प्रतिष्ठेला धक्का लागू देणार नाही "

भारतीय फौजेचा कडवा विरोध पाहून टोळीवाले चिडले. ते हल्ल्यामागून हल्ले करूं लागले. एकेक कुमाऊँ सैनिक जखमी होऊं लागला किंवा कामास येऊं लागला. कुमाऊँ वीराची संख्या कमी होऊं लागली. पण माघार घेण्याचा विचार कोणाच्या मनालासुद्धा शिवला नाही. मेजर शर्मा एका मोर्चावरून दुसऱ्या मोर्चावर जाऊन आपल्या सैनिकाना उत्तेजन देत होते, "शाबास जवान, तुम भारतके सुपूत हो। दुष्मनकी फिक्र न कीजिये। हम मर मिटेंगे लेकिन हटेंगे नहीं। अपनी पलटनकी इज्जत तुम्हारे हाथमें हैं।" मेजरसाहेबाचे शब्द ऐकले की सैनिकाचे अंगीं हत्तीचें बळ संचारे. वीर राजपूत आपल्या बेरमिया वाण्यावद्दल प्रसिद्धच आहेत. सहा तास घनघोर लढाई चालू होती. पण भारतीय सैनिकाची फळी फुटली नाही. मेजर शर्मांना अनेक जखमा झाल्या. तात्पुरती मलमपट्टी करून ते एकसारखे आपल्या सैनिकाना उत्तेजन देत राहिले. भारतीय जवान थकले, पण कचरले नाहीत. बहुतेक सैनिकाना कोठे ना कोठे तरी जखम झाली होतीच. पण त्यानी आपली हिंमत सोडली नाही. इतक्यात शर्मांना वर्मी गोळी लागली. प्राण कंठाशीं आले इतक्यात खबर आली, 'नवीन कुमक येत आहे.' आता भीति उरली नव्हती. सोमनाथ शर्मांनी आनंदाने प्राण सोडला. त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचें स्मित झळकत होतें. शर्मांनी आत्मबलिदान केलें, पण काश्मीर वाचविलें. ही घटना ३ नोव्हेंबर १९४७ साली घडली त्याच्या

अतुलनीय कामागिरीबद्दल मेजर शर्मांना मरणोत्तर स्वातंत्र्यप्राप्ती नंतरचें पहिलें ' परमवीर चक्र ' अर्पण करण्यात आलें. अशाच परमवीराचें नांव चिरंजीव होतें.



# रामा राघोबा राणे

परमवीर चक्र मिळवणारे पहिले महाराष्ट्रीय मानकरी म्हणजे सेकंड लेफ्टनंट रामा राघोबा राणे होत. कारवार जिल्ह्यांत मराठी वस्ती मोठ्या प्रमाणांत आहे. तेथील चानिआ गावीं रामा राघोबांचा जन्म एका शेतकरी कुटुंबांत झाला. रामा राघोबा मराठी सातवी पास झाल्यावर पुण्याच्या बॉम्बे इंजिनीयर ग्रुपमध्ये शिपाई म्हणून भरती झाला. प्रत्येक कामांत त्याची हुशारी दिसून येऊं लागली. दुसऱ्या महायुद्धांत कर्तबगारी दाखविण्याची संधि रामा राघोबास मिळाली. तिचा त्याने भरपूर फायदा घेतला. त्याला एकसारख्या

बढत्या मिळत गेल्या. नाईक, हवालदार, जमादार अशा हुद्द्यांवर तो एकसारखा चढत गेला. महायुद्ध संपल्यानंतर शिक्षण कमी असूनहि कामांतील त्याची हुशारी व कर्तबगारी पाहून त्यास कमिशन देण्यांत आलें. साध्या शिपायाचा तो अधिकारी बनला.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर थोडे दिवस लोटतात न लोटतात तोंच पठाण टोळीवाले व पाकिस्तानी फौजांनी काश्मीरवर आक्रमण केलें. चारी बाजूंनी आक्रमक श्रीनगरच्या रोखाने पुढे येऊं लागले. काश्मीरच्या महाराजांनी आपलें संस्थान भारतांत सामील झाल्याचें जाहीर करून भारत सरकारची मदत मागितली. भारत सरकारने तांतडीने विमानांनी सैनिकी तुकड्या काश्मीरमध्ये रवाना केल्या. शत्रूला श्रीनगरच्या वेशीवर थोपवून धरण्यांत आलें. त्यानंतर थोड्या दिवसांनी आणखी भारतीय तुकड्या येऊन पोचल्यावर भारतीय फौजांनी पाकिस्तानी फौजा व टोळीवाले यांवर प्रतिहल्ले करण्यास सुरवात केली. या प्रतिहल्ल्यांत भारतीय फौज नौशेराहून राजोरीकडे आगेकूच करूं लागली. मुलूख डोंगराळ होता. रस्ता घाटांतून जात होता. घाट ओलांडून पलीकडील मैदानांत पाक फौजांचा व टोळीवाल्यांचा रणगाड्यांच्या साहाय्याने निःपात करण्याचा बेत हिंदी अधिकाऱ्यांनी आखला. एकदा घाटांतून हिंदी रणगाडे पुढे आले की आपली धडगत नाही हें पाकिस्तानी फौजांनी ओळखलें. म्हणून त्यांनी या डोंगरांतील अवघड वाटांवर अनेक ठिकाणीं सुरुंग पेरले. वाटेंत झाडें तोडून अडथळे उत्पन्न केले !

आजूबाजूच्या उतारावर उखळी तोफा व मशिनगन्स बसविल्या. रणगाडे डोंगर ओलांडूं शकत नव्हते. त्यांच्याकरिता रस्ता मोकळा करणें आवश्यक होतें. हें काम बॉम्बे इंजिनियर ग्रुपच्या एका पथकाकडे सोपविण्यांत आलें.

या पथकाचें नेतृत्व नव्यानेच कमिशन मिळून सेकंड लेफ्टनंट झालेल्या रामा राघोबा राणे यांच्याकडे होतें. मागे रस्ता मोकळा होण्याची वाट रणगाडे अधीरतेने पाहात होते. पहिल्याच रणगाड्यांत दुसरे एक महाराष्ट्रीय अधिकारी मेजर जठार होते. राण्यांनी कामगिरी सुरू केली तोंच पाक फौजांनी उखळी तोफांचा मारा सुरू केला. सुरुंग काढण्याचें काम अतिशय अवघड असतें हें मागील एका कथेंत सांगितलेंच आहे. सुरुंग उडण्याची तर भीति असतेच. पण त्याच वेळीं सुरुंग काढण्याचें काम करणाऱ्यावर शत्रु गोळीबार करीत असतात. सर्व सुरुंग एकाच तऱ्हेचे नसतात. त्यांच्यांत अनेक जाती असतात. कांही सुरुंग नुसत्या हादऱ्यानेच उडतात. त्यांची उडण्याची रीत व आंतील यंत्राच्या खुब्या कळल्याशिवाय सुरुंग काढणें अत्यंत धोक्याचें असतें. थोडीशी चूक झाली तरी सुरुंगाचा स्फोट होऊन सुरुंग काढणारा ठार तरी होतो किंवा जखमी तरी होतो.

१५ ऑगस्ट ४७ पर्यंत भारतीय व पाकिस्तानी फौजा एकाच तऱ्हेचें रणसाहित्य वापरीत. पाकिस्तानी सुरुंगाच्या खुब्या राण्यांच्या लक्षांत लवकरच आल्या. हें सुरुंग काढण्याचें काम सावकाश व सावधगिरीने करावें लागतें. कांही सैनिकांस बाजूच्या

उतारावरून त्याच्याकडे शत्रूची मारगिरी बंद पाडण्याचें काम राण्यानी दिलें. दोन्ही बाजूंनी गोळीबार सुरू झाला. चारी बाजूनी गोळ्या उडत असताना व उखळी तोफाचे गोळे आजूबाजूस फुटत असताना क्षणभरहि विचलित न होता राण्यानी आपलें काम शातपणे चालू ठेवलें. राणे एकेक यार्ड सुरुंग निकामी करीत पुढे चालले, तसतसे मागील रणगाडे एकेक यार्ड पुढे येऊं लागले. मध्ये रस्त्यावर पाच प्रचंड झाडे आडवीं टाकून व त्याच्या भोवती सुरुंग पेरून पाकिस्तान्यानी मार्ग अडवला होता. पाक मशिनगन्सचा मारा सारखा चालू होता. राणे संथपणे काम करीत होते. बाजूचे सुरुंग त्यानी वेचून काढून निकामी केले आता मशीनगन व उखळी तोफाच्या माऱ्यात वाटेतील प्रचंड झाडें बाजूस करणें आवश्यक होतें. काही झाडाना राण्यानी दोर व साखळदंड बाधून आपल्या जवानाकडून तीं बाजूस हटवलीं. एक–दोन झाडें त्याना स्फोटक द्रव्यें बाधून त्यानी उडवून दिलीं. आता सर्व सुरुंगक्षेत्र मोकळें झालें होतें. हें काम चालू असताना जठार याचा रणगाडा आपल्या लाब पल्ल्याच्या कॅनन्समधून दूरच्या शत्रूवर मारागिरी करून राण्याना अप्रत्यक्ष साहाय्य देत होता. मार्ग मोकळा झाल्यावर राण्यानी जठाराना खूण केली. त्याबरोबर जठाराच्या नेतृत्वाखाली रणगाड्याचें पथक व मागून सैनिकी तुकड्या पुढे चाल करून निघाल्या व थोड्याच वेळात त्यानी चिंगासचें महत्त्वाचें ठाणें काबीज केलें व पाकिस्तानी फौजा माघार घेऊं लागल्या. या विजयाचें श्रेय सर्वस्वी राण्यानाच

भारतीय सैन्याने नौशेराजवळ मजबूत म्हणून संरक्षण फळी उभारली होती नौशेराचें ठाणें महत्त्वाचें असल्यामुळें तें घेण्याचा शत्रूने आटोकाट प्रयत्न केला तर उलट नौशेरा आपल्या हातून न जावें म्हणून भारतीय सैनिक प्राणपणाने लढत होते परिस्थिति कठीण होती नौशेराचें ठाण हातून गेलें असतें तर काश्मीर सुद्धाम कलाटणी मिळाली असती नौशेराच्या संरक्षणफळीमधील एका आघाडीवरील खंदकात नाईक जदुनाथसिंगाचें छोटें ठाणें होतं

शत्रूने नौशेरावर जोरदार हल्ला चढविला मशिनगन व हलकी तोफांच्या साहाय्याने शत्रु एकसारखा पुढे सरकत होता शत्रु चाळीस पन्नास फुटांवर येऊन ठेपला तो आणखी पुढे आला असता तर खंदक जाऊन संरक्षणफळींत भगदाड पडलें असतें बाका प्रसंग ओळखून आपली स्टेन गन ( अर्ध-स्वयंचलित बंदूक ) हातीं घेऊन जदुनाथसिंग खंदकातून बाहेर पडला व त्याने आपल्या स्टेन गनची मारागिरी इतक्या प्रभावीपणे केली की, जवळ येऊन ठेपलेल्या शत्रूला माघार घ्यावी लागली

पण शत्रूनेहि हिंमत सोडली नाही जमावाने हल्ला करण्या ऐवजी आपले सैनिक फैलावून त्यांनी फिरून आगेकूच सुरू केलं नाईक जदुनाथसिंगाने आपल्या छोट्या तुकडीची अत्यंत हुशारीने मांडणी केली पाचशे शत्रुसैनिक त्याच्या रोखाने चाल करून येत होते पण जदुनाथसिंगाने केलेल्या मांडणीमुळे त्याच्या सैनिकांची मारागिरी इतकी प्रभावी होती की, शत्रु पुढे येण्यास कचरू लागला

शत्रु गोळ्यांचा पाऊस पाडीत होता. त्याच्या अंगावर आठ ठिकाणीं जखमा झाल्या होत्या. तो नखशिखान्त रक्ताने न्हाला होता. कृष्णाचेंच नांव असलेल्या जदुनाथाने पाहिलें की, शत्रु हिचकत आहे, व तो बेहिंमत झाला आहे. आणखी एक जोरदार फटका शत्रूस दिला की शत्रु नामोहरम होईल अशी त्याची खात्री पटली. विजेच्या वेगाने खंदकांतून उसळी मारून स्टेन गनसह त्याने शत्रूवर चाल केली. तड् तड् तड् तड् त्याची स्टेन गन आग ओकूं लागली. पटापट शत्रु सैनिक पडूं लागले. इतर राजपूत सैनिक पण बाहेर पडले. गोळीबाराची एकच धमाल उडाली. शत्रूचे पाय उखडले. शत्रु पळूं लागला. नौशेराच्या लढाईला कलाटणी मिळाली. भारतीय फौज दम उखडलेल्या शत्रूचा पाठलाग करूं लागली. पण इतक्यांत एक गोळी जदुनाथसिंगाच्या डोक्यांत घुसली. दुसऱ्याच क्षणीं त्याचें निर्जीव कलेवर खाली कोसळलें. पण जदुनाथसिंगाच्या आत्मबलिदानाने भारताकडे विजयश्री खेचून आणली. संभाव्य पराभवाचें परिवर्तन विजयांत झालें. नौशेराच्या विजयांत जदुनाथसिंगाचा मोठा वांटा आहे. त्याच्या असीम पराक्रमाबद्दल त्याला मरणोत्तर परमवीर चक्र बहाल करण्यात आलें





## हरिश्चंद्राच्या हिकमती

गव्हाळ रंग ठेंगणी मूर्ति, दणकट शरीर व किंचित् पुढे आलेली व निग्रह दर्शविणारी चौकोनी हनुवटी असे कर्नल हरिश्चंद्राचें वर्णन करता येईल त्याचे वाडवडील व बहुतेक नातेवाईक सैन्यातच होते व आहेत वडीलहि सैन्यात L M D (वैद्यकीय पथक) मध्ये सुभेदार होते हरिश्चंद्र मॅट्रिक पास झाला. त्याने खूप शिकावें म्हणून वडिलानी त्याला मुद्दाम कॉलेजात घातलें पण कॉलेजात इतिहास–काव्यात त्याचें मन रमेना तोफा–बंदुकाने आवाज त्याला जणू काय आवाहन करीत होते रक्तातील शेकडो वर्षांचा लष्करी बाणा त्याला स्वस्थ बसू देईना हरिश्चंद्राने

पुस्तकें फेकलीं. व सरळ बेळगावचा रस्ता धरला. तिथें हरिश्चंद्र मराठा पलटणींत भरती झाला.

थोड्याच दिवसांत अंगची हुशारी व खेळातील नैपुण्य ह्यामुळे तो अधिकाऱ्यांच्या नजरेंत भरला. त्या काळीं मॅट्रिक परीक्षा पास झालेल्या होतकरू लष्करी परंपरेच्या तरुणास अधिकारी बनविण्याच्या दृष्टीने वाय् कॅडेटस् म्हणून भरती करून घेत. हरिश्चंद्र वाय् कॅडेट होते. रंगरूटी शिक्षण संपताच त्याला लान्स नाईक बनविण्यात आलें. त्याच्यात अधिकारी होण्याचे गुण आहेत, हें पाहून फौजेंतील अधिकारी उमेदवाराना खास पूर्वशिक्षण देणाऱ्या नोगावच्या किचनेर कॉलेजमध्ये त्यास प्रवेश देण्यात आला. दोन वर्षांच्या शिक्षणानंतर डेहराडूनच्या मिलिटरी ॲकॅडमींत त्याला पाठविण्यात आलें. अडीच वर्षांनतर हरिश्चंद्र सेकंड लेफ्टनंट झाला.

थोड्याच दिवसानी दुसरें महायुद्ध सुरू झालें. हरिश्चंद्राच्या कर्तबगारीस वाव मिळाला. त्या वेळीं भारतीय सैन्यात ब्रिटिश अधिकाऱ्याचा वरचष्मा असे. ते हिंदी अधिकाऱ्याना नेहमी दाबण्याचा प्रयत्न करीत. पण बेडर हरिश्चंद्र त्याच्याशीं बरोबरीने मुकाबला करी, व आपल्या हक्कांकरिता भाडत असे पण त्याच्या अंगच्या गुणामुळे ब्रिटिश अधिकाऱ्यांना त्याच्याविरुद्ध काही करता येईना. युद्ध संपण्याचे वेळीं ते मेजरच्या हुद्द्यावर होते.

पूर्वी भारतीय फौजेंत दहा गुरखा रेजिमेंटस् असत. प्रत्येक रेजिमेंटमध्ये दोन पलटणी असत. बहादुर गुरख्याचा इतर

भारतीयांशीं ब्रिटिश संबंध येऊं देत नसत. गुरखा पल्टणींत फक्त युरोपियन अधिकारीच नेमीत व गुरखा पलटणी नेहमी ब्रिटिश पलटणीबरोबर ठेवीत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ब्रिटिश व भारत ह्याच्या-मध्ये गुरखा रेजिमेंटसूची वाटणी करण्यात आली. भारताकडे सहा गुरखा रेजिमेंटस् आल्या. ब्रिटिशांकडे चार गेल्या. ब्रिटिश जाणार असल्यामुळे उज्ज्वल शौर्याची परंपरा असलेल्या गुरखा पलटणीवर भारतीय अधिकारी नेमण्याचा प्रश्न उपस्थित झाला, तेव्हा हिंदी फौजेंतील निवडक अधिकाऱ्यांच्या गुरखा पलटणींत नेमणुका झाल्या. त्यात हरिश्चंद्रांची २।५ व्या गुरखा पलटणींत मेजर म्हणून नेमणूक झाली. थोडयाच दिवसांत ते लेफ्टनंट कर्नल बनून आपल्या पलटणीचे कमांडिंग ऑफिसर झाले.

स्वराज्यप्राप्तीनंतर थोडयाच दिवसांत टोळीवाल्यांनी व पाक फौजानी भारतावर आक्रमण केलें. त्यांच्या लोंढ्यापुढे काश्मिरी फौजेचा टिकाव लागेना. काश्मीर नरेशांनी काश्मीर भारतांत सामील झाल्याचें जाहीर करून भारत सरकारकडे मदत मागितली. सामीलनाम्यामुळे काश्मीर भारताचाच भाग बनल्याकारणाने भारतीय प्रदेशाच्या रक्षणार्थ भारतीय तुकडया पाठविण्यात आल्या. रस्त्याने गेल्यास वेळ लागेल म्हणून सुरुवातीच्या भारतीय तुकडया विमानाने पाठविण्यात आल्या. पश्चिम व दक्षिणेप्रमाणेच उत्तरेकडून गिलगिट-स्कॉर्डू मार्गेंहि टोळीवाले व पाक फौजा यांनी काश्मीरवर आक्रमण केलें. उत्तरेकडील ह्या शत्रूच्या फौजास थोपवून धरणें आवश्यक होतें. म्हणून एकाएकीं हरिश्चंद्राना विमानाने आपल्या

पलटणीसह लेह–लडाखकडे पाठविण्यात आलें. लेह–लडाखचे सर्वाधिकार त्याना देण्यात आले व तेथील मिलिटरी गव्हर्नर म्हणून त्याची नेमणूक झाली.

दोन दिवसात हरिश्चंद्राची पुरी पलटण लेहला उतरली थडीचे दिवस होते. पाच–दहा फूट बर्फ सर्वत्र पडला होता. मुलूख डोंगराळ व वैराण होता लोक बौद्ध धर्मीय असून त्याना लढण्याची सवय नव्हती. शत्रूची सख्या सुमारें सात हजार होती. हरिश्चंद्राजवळ फक्त सातशें सैनिक होते. दोनशे मैल लाबीची सरहद्द त्याना साभाळायची होती. प्रसग बाका होता, वेळ आणीबाणीची होती लेह पडलें की श्रीनगरला व तिथे लढणाऱ्या फौजेला धोका उत्पन्न होणार होता.

पण हरिश्चंद्र डगमगले नाहीत. शत्रूच्या हालचालींची बित्त-बातमी तात्काल मिळावी म्हणून तेथील मुलखाची सूक्ष्म माहिती असलेल्या काही लडाखी लोकाची टेहेळे म्हणून त्यानी भरती केली या टेहेळ्याना त्यानी महत्त्वाच्या जागीं ठेवलें व शत्रूच्या हालचालींची त्वरित बातमी मिळण्याची व्यवस्था केली आपल्या पलटणीच्या त्यानी सोयीस्कर तुकड्या बनविल्या व प्रत्येक तुकडी म्हणजे जणू काय एक स्वतत्र पलटणच आहे असा भास शत्रूत निर्माण केला. कारण लेह–लडाखमध्ये एकच पलटण आहे असें कळलें असतें तर संख्याधिक्य असलेल्या शत्रूने त्याच्यावर खुल हल्ला केला असता

शत्रूला फसविण्याची त्यानी आणखी एक युक्ति काढली

आपल्यापाशीं असलेल्या थोड्याशाच मशिनगन्स ते सारख्या हलवत असत. एका ठिकाणीं काही वेळ जोरदार गोळीबार करून खेचरावरून मशिनगन्स हलवून ते दहा मैल पलीकडे नेत. तिथे थोडा वेळ गोळीबार करून त्या फिरून हालवून आणखी दहा-पाच मैल पलीकडे नेत. पाकिस्तानी व भारतीय फौजातील रेडिओ सेट्स व संदेश पाठविण्याच्या पद्धती त्या वेळीं एकच होत्या. त्यामुळे पाकिस्तानी वरिष्ठ अधिकाऱ्यानी रेडिओवरून सोडलेले हुकूम त्याना कळत व त्याप्रमाणे ते आपल्या तुकड्याची रचना करीत. आपल्या तुकड्याना हुकूम देतांना मात्र ते प्रत्येक तुकडी जणू काय स्वतंत्र पलटणच आहे अशा थाटाने हुकूम सोडत. ते पाकिस्तानी अधिकारी ऐकत. त्यामुळे भारतीय फौजेच्या बळाबद्दल त्याच्या भलत्याच कल्पना होऊन आपल्यासमोर पाच-सहा हजार भारतीय फौज आहे असा त्याचा समज झाला.

दडुकेशाही कर्नल म्हणून हरिश्चंद्राची प्रसिद्धि आहे. ते कर्तव्यात कठोर आहेत. ते स्वत. घोड्यावरून रोज पन्नास-साठ मैल प्रवास करीत व आपल्या तुकड्याना भेट देत. एके ठिकाणीं दोन्ही पक्ष एकमेकावर गोळीबार करीत होते, तो ऐकून हरिश्चंद्रानी आपलें घोडें जोगत पुढे दामटलें. ते टेकडी चढत होते इतक्यात एक उराळी तोफेचा गोळा घोड्याच्या पुढे फुटला. स्फोटामुळे दगडमाती उडाली. घोडा बिथरून एकदम दोन पायावर उभा राहिला. हरिश्चंद्र खाली पडले व डोंगरावरून गडगडत खाली गेले. एका बाजूच्या बरगड्या माराने दुखू लागल्या. त्याना नीट श्वास

घेता येईना. जवळच गुरखा तुकडीचा मुक्काम होता त्यानी घोडें धरलें व तेथील म्ययपाकघरातून हळद-तूप घेऊन आपल्या बरगड्यास चोळली. व बरगड्यांभोवती बॅंडेज बाधून फिरून घोड्यावर स्वार झाले. बरगड्या मोडल्या असाव्यात असे पलटणीच्या डॉक्टरचे निदान होते व त्यानी हॉस्पिटलमध्ये जावें असा त्याने आग्रह चालविला. पण लढाई सोडून इस्पितळात पडून राहाणें कर्नलसाहेबास पसत नव्हते. त्यानी हॉस्पिटलमध्ये जाण्यास नकार देऊन आपलें काम चालूच ठेवलें पुढे युद्धबंदी झाल्यावर एका जुजबी पुलावरून जात असताना ते फिरून एकदा घोड्यासह खाली पडले. आता दुसऱ्या बाजूच्या बरगड्यास मार बसला होता. युद्धबंदीमुळे त्यानी इस्पितळात जाण्याचे कबूल केलें तिथे पोचल्यावर दोन्ही बाजूंच्या दोन-दोन बरगड्या मोडल्याचें क्ष-किरणानी फोटो काढल्यावर कळून आलें

हरिश्चंद्राचा खाक्या और असे एकदा एका डोंगराच्या पलीकडे शत्रूचें ठाणें असल्याची बातमी मिळाली. त्यानी पलटणीच्या एका तुकडीच्या अधिकाऱ्यास चोवीस तासाच्या आत पलीकडील ठाणें घेण्यास फर्मावलें समोरचा डोंगर पाच-सहा हजार फूट उच होता. जाण्यास मार्ग नव्हता अधिकारी किंचित् गागरला तो म्हणाला, "साहेब, हें काम कठीण आहे एवढा डोंगर चढून पलीकडे शत्रूवर चोवीस तासात हल्ला करणे कठीण आहे " तुडू ठोकून कर्नलसाहेब गरजले, "मीं दिलेला हुकुम तुम्हीं ऐकला आहे त्याची अमलबजावणी झालीच पाहिजे तुम्ही अधिकारी

कशाकरिता झाला ? मार्ग कसा काढायचा तें तुम्हीच ठरवा तुम्ही डोंगर ओलांडून जा, बोगदा पाडून जा, पण तुम्हाला गेलं हें पाहिजेच व चोवीस तासात शत्रूचें ठाणें हातीं आलेंच पाहिजे समजलं ?" मग अभिका यानें दुर्गम डोंगर ओलांडला कर्नल-साहेबाच्या भीतीमुळे त्याला वाट मिळाली. चोवीस तासात ठाणें सर झालें असा करारी कर्नल असावा लागतो.

दुसऱ्या एका खेपेस, एका तुकडीस त्यांनी एका पाकिस्तानी ठाण्यावर हल्ला करण्यास पाठविलें जबरदस्त हातघाईची लढाई झाली तुकडीनें ठाणें जिंकलें, पाकिस्तानी पळाले. तुकडीचा अधिकारी खुषींत आला व हें वृत्त कर्नलसाहेबांना सांगण्याकरता तो त्यांना रेडिओवरून हुडकू लागला आघाडीवरील रेडिओ किंवा रेडिओ–टेलिफोन संदेश पांच–दहा मैलांच्या अंतरातच पाठवता येतात सुमारे अर्ध्या तासानें त्याला कर्नलसाहेब सापडले तो त्यांना उत्साहानें सांगू लागला, "कर्नलसाहेब, ठाणें सर झालें, शत्रु पळून गेला, आम्ही अनेक शत्रूंना ठार केलें आहे, आपली फत्ते झाली" त्याची अपेक्षा होती की, कर्नलसाहेब आपणास शाबासकी देऊन आपलें कौतुक करतील पण त्याऐवजी कर्नलसाहेबांचे कठोर शब्द त्याला ऐकू आले, "मूर्खा, तू ठाणें घेतलेंस पण शत्रु पळाला अर्धा तास मला तू टेलिफोन करण्यात घालवलास त्याऐवजी बेहिम्मत झालेल्या शत्रूचा जर तू पाठलाग केला असतास तर शत्रु पुरा गारद झाला असता युद्धशास्त्रातील

तत्त्वाचा तूं भंग केला आहेस. आधी ऊठ, आणि पाठलाग सुरू कर, शत्रूचा पुरा निःपात कर, मग मी तुला डोक्यावर घेऊन नाचेन." अशा कर्नलच्या नेतृत्वाखाली शूर सैनिक काय करूं शकणार नाहीत?



# धनसिंग थापा

१९ ऑक्टोबर १९६२ चा दिवस होता. पाँगाँग सरोवराच्या किनाऱ्यावरील भारतीय फौजेच्या आघाडीवरील ठाण्यात एकच आवाज उठला "मेजर धनसिंग थापासाहब जिंदाबाद", "मेजर धनसिंग थापांची जय". ठाण्यांतील वीर गुरखे खुशीत होते. त्यांच्या ठाण्याचे प्रमुख कॅ. धनसिंग थापा यांना बढती मिळून ते मेजर झाल्याची खबर दुपारींच येऊन पोचली होती. सामुग्री तुटपुंजी असूनहि शिबंदीच्या आचाऱ्यानें चमचमीत मेजवानीचा बेत आखला होता. धनसिंग थापा अत्यंत लोकप्रिय अधिकारी होते. पलटणीच्या खेळात ते जवानांच्या बरोबरीने भाग घेत.

त्याच्या सुखदु खात सहभागी होत सर्व जवानाच त्याच्यावर निरतिशय प्रेम होतें आपल्या आवडत्या अधिकाऱ्यास बढती मिळाल्याची वार्ता येताच सर्व जवानाना अत्यानद झाला सध्याकाळीं मेजवानी ठरली गुरख्याना प्रिय असलेल्या रमच्या बाटल्या उघडण्यात आल्या गुरखा पद्धतीप्रमाणे जवानानी आनदाने बेहोश होऊन नाच केला आपल्या प्रिय अधिकाऱ्याला त्यानी खाद्यावर उचलून घेऊन त्याच्या नावें त्रिवार जयजयकार केला

१९ ची मध्यरात्र उलटून गेली २० तारखेची पहाट झाली सत्री हुशारीने गस्त घालीत होते, सर्वत्र सामसूम होतें शेजारच्या पँगाँग सरोवराच्या लाटा खळखळ करीत होत्या सर्वत्र धुकें पसरलें होतें प्रकाश वाढू लागला धुक्याच्या सागरातून उचच उच गेलेल्या पर्वताच्या शिखरावर उप कालचा लाल रग पसरला होता काही अतरावर पलीकडील चिनी फौजेच्या चौक्या होत्या धुक्यामुळे तेथील हालचाल दिसत नव्हती हळूहळू टेकड्यामागून सूर्याचें बिंब दिसू लागलें, धुकें कमी होऊ लागलें दूर चिनी चौक्या अस्पष्ट दिसू लागल्या

आणखी काही मिनिट निघून गेली वाढत्या उष्णतेमुळे धुक्याचें पटल विरळ झालें इतक्यात शिट्टयाचा कर्कश आवाज कानीं आला भारतीय सत्री शत्रूच्या चौक्याची टेहेळणी करू लागले इतक्यात चिनी चौक्यात हालचाल दिसू लागली चौक्याच्या आसपास असख्य चिनी दिसू लागले एकाएकीं चिनी

डोंगरी तोफखाना धडाडू लागला. तोफांचे आणि मोठ्या उखळी तोफांचे गोळे भारतीय ठाण्याच्या आसपास पडू लागले. त्यांच्या स्फोटामुळे उडालेली माती व दगडांचे तुकडे सर्वत्र उडू लागले. मेजर धनसिंग थापानी ओळखले की, ही चिनी आक्रमणाची नांदी आहे. तोफांचे आवाज सुरू होताच त्यांची मुद्रा करारी बनली. मेजरसाहेबांनी सावधानीची सूचना दिली. ते म्हणाले, "जवान, हुशार रहो। तोफखान्याची मारगिरी संपताच शत्रु चाल करून येईल, प्रत्येकजण आपापल्या नेमलेल्या ठिकाणी तयारीत राहा, गोळ्या वाया घालवू नका, मी हुकूम देताच गोळीबार सुरू करा." जवान आपापल्या जागी शत्रूच्या येण्याची आतुरतेने वाट पाहू लागले. प्रत्येकाचा हात बंदुकीवर होता. दुसरा हात प्रेमाने कुकरीला (कमरेच्या) गोंजारीत होता.

चिनी चौक्यामागून घरघर ऐकू आली. मधल्या उघड्या मैदानावर चिनी सैनिकांनी भरलेल्या मोटारी धावू लागल्या. त्या खाचखळग्यातून धक्के खात पुढे येत होत्या. वीर गुरखे जवळ येणाऱ्या मोटारींकडे आतुरतेने पाहात होते. आजूबाजूस गोळे फुटत होते त्यांची त्यांनी पर्वा केली नाही. त्यांचा आपल्या नेत्यावर पूर्ण विश्वास होता.

मेजर धनसिंग थापाच्या पोत्याआडून डोळ्यास लावलेल्या दुर्बिणीतून शत्रूचे आगेकूच निरीक्षीत होते त्यांनी उजवा हात वर केला चिनी मोटारी बंदुकीच्या टप्प्यात येताच त्यांनी हात एकदम खाली केला. गोळीबार सुरू करण्याचा इशाराच होता

तो. दुसऱ्याच क्षणीं भारतीय शिबंदीच्या खंदकातून लक्ष्यवेधी गोळीबार सुरू झाला. मोटारींत उभे असलेले चिनी सैनिक कोसळूं लागले. मोटारी थबकल्या. काहींच्या टायर्स फुटल्या होत्या. गोळ्यानी काहींचीं इंजिनें बंद पडलीं होतीं. एका मोटारीने पेट घेतला. मोटारी थबकल्या. अनेक चिनी सैनिकानी मोटारींतून उड्या मारून मागे पलायन केलें. उंचवटयाचा व खडकाचा ते आसरा घेऊं लागले. पहिला चिनी हल्ला वीर गुरख्यानी परतवला होता.

पण धनसिंग व त्याचे वीर गुरखे ह्याना माहीत होतें की, चिनी थोड्याच वेळात फिरून हल्ला चढवतील. चिन्याच्या दुसऱ्या हल्ल्याची ते वाट पाहूं लागले. चिन्यानी फिरून तोफांचा भडिमार सुरू केला. त्या आता अधिक अचूक मारागिरी करूं लागल्या. चिनी गोळे खंदकात फुटूं लागले. आधीच संख्येने कमी असलेल्या भारतीय सैनिकाची संख्या आणखी कमी होऊं लागली. पण कोणाचेंहि मन विचलित झालें नाही. आपल्या मृत व जखमी सैनिकबंधूना पाहून शत्रूला निकराने तोंड देण्याचा त्याचा निर्धार अधिक दृढ झाला. प्राणांतिक जखम झालेला एक जवान होणाऱ्या यातना दाबून आपल्या हुद्देदारास म्हणाला, " नाईकसाहेब, मी तर आता मरणार, पण माझ्या शस्त्राला आणखी चिनी बळी पडले पाहिजेत. माझ्या कमरेचा हात बाँब तुम्ही काढून घ्या, व शत्रु जवळ येताच माझ्या नावें तो त्याच्या अंगावर फेका. " मेजरसाहेब निश्चयी स्वरात म्हणाले, " शाबास

जवान, आपल्या प्रत्येक माणसाबद्दल किमान २० चिन्यांचे तरी बळी घेतल्याशिवाय आम्ही राहाणार नाही." मृत्युपंथास लागलेल्या त्या वीर गुरख्याच्या चेहऱ्यावर समाधानाचें स्मित झळकलें.

पण थोड्याच वेळात फिरून चिनी मोटारी घरघरूं लागल्या. मोटारींची संख्या वाढली होती. आता अनेक बाजूंनी त्या भारतीय. ठाण्याच्या रोखाने येऊं लागल्या. मोटारी टप्प्यात येताच फिरून मेजर साहेबानी हुकूम दिला, " Fire! ". भारतीय सैनिकांच्या बंदुका तडतडूं लागल्या. भारतीय मारगिरीपुढे चिन्यांची मात्रा चालेना. अनेक चिनी सैनिक मरून खाली पडले. फिरून चिनी फौज मागे हटली. पण भारतीय जवानांची संख्याहि आणखी रोडावली होती. मेजर धनसिंग थापानी उरलेले सैनिक एकत्र केले. कोणाच्याच तोंडून शब्द निघत नव्हता. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर " मारूं किंवा मरूं " अशीच भावना दिसत होती.

चिनी हटले खरे, पण थोड्याच वेळात त्यांनी तिसऱ्या हल्ल्याची तयारी केली. पण ह्या खेपेस केवळ मोटारींचीच घरघर ऐकूं आली नाही तर रणगाड्यांचा धडधडाटहि ऐकूं आला. वीर गुरख्यापुढे चिनी पायदळाची डाळ शिजत नाही असें पाहून चिन्यांनी आता रणगाडे पुढे आणले. भारतीय शिबंदीजवळ रणगाडाविरोधी तोफाहि नव्हत्या. केवळ रायफली, मशिनगन्स व उखळी तोफा होत्या. रणगाड्याला रणगाडाच जबाब देऊं शकतो. पण गुरखा सैनिकांनी धीर सोडला नाही. आंगच्या

असीम धैर्याने त्याना पोलादी पुतळे बनविलें होतें. रणगाडे जवळ येऊं लागले, त्याच्या तोफांचा मारा खंदकावर होऊं लागला, धरणी कंपायमान होत होती. रणगाडे जवळ येतांच गुरखा सैनिकांनी त्याच्यावर हात बॉंब, मशिनगन्स व बंदुकींचा मारा केला. पण रणगाडयावर त्याचा काय परिणाम होणार? यमराजाच्या दूताप्रमाणे इंच इंच रणगाडे पुढे येऊं लागले. भारतीय सैनिक पटापट मरूं लागले. खंदकापासून थोडयाच अंतरावर रणगाडे येऊन ठाकले. मेजर धनसिंग थापानी आपल्या दोन्ही बाजूंस खदकात नजर टाकली. त्याच्याशिवाय एकहि भारतीय सैनिक जिवंत नव्हता. एकटे मेजर थापा व समोर अगणित चिनी सैन्य ! अनेक रणगाडे खंदकाचे दिशेने येत होते. मेजर धनसिंग थापाच्या अंगीं हजार हत्तींचें बळ आलें. एक विरुद्ध हजार ! मेजर थापानी खंदकाच्या बाहेर उडी मारली. त्यांच्या हातातील बंदूक आग ओकूं लागली. पट् पट् पट् अनेक चिनी मरून पडले. बेभान होऊन धनसिंग पुढेच जात राहिले. शत्रूच्या चक्रव्यूहात आधुनिक काळचा वीर अभिमन्यु व्यूहभेद करण्यास निघाला होता. मेजर थापा काही पावलेंच पुढे गेले. इतक्यात अनेक गोळ्या त्याच्या शरीरात घुसल्या, ते सार्ली कोसळले. त्याचें भान हरपलें. धन्य मेजर थापाची आणि त्याच्या वीर सैनिकांची ! अक्षरश' शेवटचा मनुष्य व शेवटची गोळी जवळ असेपर्यंत ते लढत राहिले.

प्रथम मेजर थापाना वीरगति प्राप्त झाली आहे, असें वाटलें.

त्यांच्या पराक्रमाचा पोवाडा ऐकून प्रत्येक भारतीय नागरिकाचें अंग शहारलें. राष्ट्रपतींनी त्यांना भारतीय सेनेंतील अत्युच्च सन्माननिदर्शक "परमवीर चक्र" मरणोत्तर बहाल करण्याचें जाहीर केलें. पदकाच्या नांवाप्रमाणेच जे शत्रूला तोंड देत असतांना असामान्य शौर्य, धैर्य व नेतृत्व प्रगट करतात, त्याच वीरांना हें पदक बहाल करण्यांत येतें. हें पदक ब्राँझचेंच असतें, पण त्याचें मोल कुबेराच्या संपत्तीहूनहि अधिक आहे. जानेवारी महिन्यांत मेजर धनसिंग थापा मृत नसून जखमी होऊन चिन्यांचे हातीं युद्धकैदी आहेत अशी बातमी आली आहे. ती खरी ठरो, व भविष्यकाळांत ह्या वीरपुरुषाचें नेतृत्व भारतीय सैन्यास लाभो अशीच प्रत्येक भारतीयाची इच्छा असणार.



# बचीसिंगाची समयसूचकता

हिमालयाच्या उतारावर उत्तर प्रदेशांत आलमोडा जिल्हा आहे. तेराव्या चौदाव्या शतकांत मुसलमानी आक्रमणामुळे त्यांचा प्रतिकार करतां करतां हजारो वीर राजपुतांनी हिमालयाच्या उतारावर जाऊन वस्ती केली. त्यांची वस्ती मुख्यत्वें आलमोडा व रानीखेत जिल्ह्यांत आहे. तेथील हिमालयाच्या ओळीला "कुमाऊँ" पर्वतराजी म्हणतात आणि त्यावरून तेथील राजपुतांस

'कुमाऊँ राजपूत' असें नाव मिळालें आहे. कुमाऊँ राजपुताच्या खास कुमाऊँ पलटणी आहेत. आपला राजपूत बाणा व परंपरा कायम राखण्याकरिता ह्या दोन जिल्ह्यातून हजारों कुमाऊँ राजपूत लष्करात भरती होत असतात. काही काळ हा भाग नेपाळच्या ताब्यात होता. पण १८१४ मार्ली नेपाळशीं झालेल्या तहान्वयें हा भाग ब्रिटिशांकडे आला. हे कुमाऊँ राजपूत सडपातळ पण काटक असून डोंगरी लढाईत तरबेज असतात.

चिनी आक्रमणाच्या वेळीं बचीसिंगाची कुमाऊँ पल्टण नेफा विभागात होती. नेफा विभागातील बिजुट ठाणें महत्त्वाचें आहे. ह्या ठाण्यावर कुमाऊँ व आसाम पलटणींतील काही सैनिक ठेवण्यांत आले होते. ह्या ठाण्याच्याच शेजारीं काही मैल अंतरावर दुसरें भारतीय ठाणें होतें. अनेक वेळा बचीसिंगाकडे ह्या शेजारच्या ठाण्यावर महत्त्वाचें टपाल किंवा निरोप पोहोचविण्याची कामगिरी सोपविण्यात येई. एके दिवशीं सायंकाळीं बचीसिंगाला शेजारच्या ठाण्यावर महत्त्वाचा निरोप देऊन पाठविण्यात आलें. जंगल-डोंगरात जन्मलेल्या बचीसिंगाला अंधारात किंवा रात्रीं जंगलातून जाण्याची कधीच भीति वाटत नसे.

बचीसिंग निरोप घेऊन गेल्यावर रात्रीं अकरा वाजतां चिनी सैनिकांनी संख्याधिक्याने त्याच्या ठाण्यावर हल्ला चढविला. एक-दोन चिनी हल्ले परतून लावण्यात आले. परंतु चिन्याच्या अधिक संख्येमुळे व त्याच्या भयंकर मारगिरीमुळे भारतीय तुकडीस माघार घ्यावी लागली. काही अंतर दक्षिणेस जाऊन त्यांनी नवीन मोर्चा बनविला.

बचीसिंगाने पलीकडच्या ठाण्यावर निरोप पोहोचविला. तिथल्या सैनिकांनी आग्रह केल्यामुळे त्याने संध्याकाळचें जेवण तिथेंच घेतलें. मग रात्रीं आपल्या ठाण्यावर कूच केलें. बचीसिंग निघाला. रमत गमत तोंडाने पहाडी गाणीं म्हणत बचीसिंग डोंगरांतून व जंगलांतून ओळखीच्या वाटेने परत येत होता. पहाटे तीन–चारच्या सुमारास तो आपल्या ठाण्याजवळ येऊन पोहोचला. मध्यंतरीच्या काळांत आपल्या तुकडीने ठाणें सोडल्याची त्याला अर्थातच माहिती नव्हती.

बचीसिंग ठाण्याजवळ आला. थंड वारा घोंघावत होता, कडाक्याची थंडी होती. ठाण्याजवळ अंधारात त्याला तीन आकृती दिसल्या. त्याला वाटलें की, आपलेच कुमाऊँ सैनिक पहाऱ्याकरिता बाहेर उभे असतील. बचीसिंगाची चाहूल लागतांच तिन्ही आकृती स्तब्ध झाल्या. ते चिनी असतील ही कल्पनाहि नसल्यामुळे बचीसिंग निःशंकपणे त्यांच्याजवळ गेला. तो अगदी जवळ आला तेव्हा त्या आकृतींनी त्याला हटकलें, तेंहि हिंदी भार्षेत. बचीसिंगाला त्यांत विशेष कांही वाटलें नाहीं. कारण युद्धकाळांत अशी हटकण्याची प्रथा असते. बचीसिंग उत्तरला, "दोस्त". दोन हात अंतर राहिलें. एकदम तिन्ही आकृती उद्गारल्या, "हिंदी चिनी भाई भाई" हे शब्द ऐकतांच काही तरी वेगळाच प्रकार आहे असें वाटून बचीसिंग जागच्या जागीं थबकला. त्याबरोबर चिनी सैनिकांनी तीन्ही बाजूंनी त्याला संगिनींनी घेरलें. बचीसिंगाची बंदूक खांद्यावरच होती. त्याला कांही करतां येणें शक्य नव्हतें. तो युद्धबंदी झाला होता.

पण बचीसिंगाच प्रसगावधान ढळलें नाही हा पहाडी वीराने ओळखलें की, आपण शत्रूच्या कचाट्यात सापडलों आहों त्याने आजूबाजूच्या प्रदेशाकडे दृष्टिक्षेप टाकला जमीन उचसखल होती, प्रचड शिला इतस्तत पडल्या होत्या झाडी दाट होती हा नैसर्गिक परिस्थितीचा आपणास फायदा घेता येईल अस बचीसिंगास वाटलें उजेड होईपर्यंत थाबणें धोक्याचें होतें अधार असतानाच काही तरी केलें पाहिजे, हें त्याने ओळखलें चिनी सैनिक सगिनी रोखून त्याला मुख्य ठाण्याकडे घेऊन निघाले होते जवळ एक प्रचड खडकाचा सुळका होता बचीसिंगाने एकदम मागे वळून चित्त्यासारखी झडप घालून त्या तिघाहि सैनिकाच्या बदुकावर प्रहार केला बदुकी वाकड्यातिकड्या झाल्या, त्या एकमेकात गुतल्या दुसऱ्याच क्षणीं विद्युल्लतेप्रमाणे बचीसिंगाने अधारात उडी घेतली व क्षणभरात तो त्या सुळक्याच्या आड झाला दोन–चार क्षण चिनी सैनिक दिङ्मूढ होऊन राहिले शेवटीं त्याच्यापैकी एकाने आपली बदूक झाडली एक गोळी बचीसिंगाच्या दडाम चाटून गेली पण पहाडात वाढलेल्या बचीसिंगाला जनावरासारख जणू काही रात्रीं दिसत होते तो लवकरच जगलात अदृश्य झाला मग डोंगरातून व जगलातून पायपीट करीत तो वालोंग ठाण्यावर सुखरूप येऊन पोचला



# जोगिंदरसिंग

•

गेल्या महायुद्धापर्यंत भारतावर पूर्वेकडून व उत्तरेकडून कधीहि आक्रमण झालें नव्हतें. सरक्षणाच्या दृष्टीने भारत सरकारचें लक्ष वायव्य सरहद्दीवर केंद्रित झालेलें असे. पण ४२ सालीं जपानने ब्रह्मदेश जिंकून हिंदुस्थानला धोका उत्पन्न केला, तेव्हा पूर्व सरहद्दीचें महत्त्व ओळखून भारत सरकारने पूर्वोत्तर सरहद्दीचा भाग आसामपासून वेगळा काढून त्याचा कारभार आपल्या हातीं घेतला. ह्या विभागालाच नेफा (North East Frontier Agency) असें नाव देण्यात आलें. गेल्या ऑक्टोबर–नोव्हेंबरमध्ये ह्याहि विभागात चिनी फौजानी मोठें आक्रमण केलें. ह्या विभागात

हिमालयाची शिखरें आहेत. डोंगराच्या उतारावर घनदाट अरण्यें आहेत. प्रत्येक दोन डोंगराच्या ओढीमधून ओढा किंवा नदी वाहते. सर्व हालचाल पायानीच करावी लागते. येथे केवळ पायवाटाच आहेत. त्यावरून फक्त माणसें व खेचरेंच जाऊं शकतात अधूनमधून दोन डोंगराच्या फटींत असलेल्या खिंडींतून तिबेटमध्ये जाण्याच्या वाटा आहेत. लढाईत ह्या खिंडींना अर्थातच फार महत्त्व असतें. अशी एक खिंड थागला पहाडाच्या खाली टाँगपाँग येथे आहे. ह्या खिंडीला टाँगपाँग—ला असें म्हणतात. पहाडी भाषेत 'ला' म्हणजे खिंड होय. ह्या खिंडीचें रक्षण करण्याकरिता खिंडीच्या थोड्या दक्षिणेस एक भारतीय सैनिकी ठाणे होतें ह्या ठाण्यात फक्त एक ह्रॅट्रन म्हणजे सुमारें ४० सैनिक होते हे सैनिक शीख पलटणीचे होते. सुभेदार जोगिंदरसिंग ह्या ठाण्याचे प्रमुख होते

जोगिंदरसिंग आणि त्याचे जवान डोळ्यात तेल घालून पहारा देत होते. २० तारखेस पहाटे त्याना तोफांचे आवाज ऐकू येऊं लागले. त्याचे प्रतिध्वनि सर्वत्र उमटत होते ९ तारखेपासून शत्रु सैन्याच्या जमवाजमवीची बातमी सर्व ठाण्याना देण्यात आलेली होती. शेजारच्या आघाडीवर शत्रूने हल्ला केला असला पाहिजे असें सुभेदार जोगिंदरसिंगास वाटलें त्याच्या ठाण्यावरहि केव्हा हल्ला होईल हें सांगता येत नव्हतें. सुभेदार जोगिंदरसिंग अधिक दक्षतेने समोरच्या टेकड्याचें दुर्बिणींतून निरीक्षण करूं लागले. सर्व जवानहि टेकड्यांची टेहेळणी करूं लागले. एक-दोन दिवसात

आपल्याहि ठाण्यावर हल्ला होईल असे त्याना वाटूं लागलें २० ऑक्टोबरची संध्याकाळ झाली तरी शत्रूची हालचाल दिसेना. रात्रीच्या सैन्याना विशेष जागरूक राहण्याची सूचना सुभेदार-साहेबानी दिली. २१ ऑक्टोबरचा दिवस उजाडला. तरीहि शत्रूची हालचाल दिसेना. २२ तारीखहि तशीच गेली सुभेदार-साहिब आणि त्याचे जवान शत्रूची वाटच पाहत होते

२३ ऑक्टोबरची पहाट झाली. पूर्व दिशेस तांबड फुटलें. उगवत्या सूर्याच्या किरणानी उत्तुग हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखराना सोन्याचा मुलामा चढविला. इतक्यात संत्री ओरडला, " सुभेदार साहेब, खिंडीच्या वरील बाजूस हालचाल दिसत आहे, दुष्मन येत आहे. " सुभेदार साहेबानी तात्काल इशाऱ्याची शिटी वाजविली. सर्व जवान आपापल्या नेमलेल्या स्थळीं सज्ज झाले. खिंडीच्या पलीकडील डोंगराच्या उतारावरून असंख्य शत्रु–सैनिक मुंग्याप्रमाणे खिंडीच्या रोखाने उतरू लागले. खिंडीतूनच नव्हे तर बाजूच्या उतारावरूनहि असंख्य शत्रु–सैनिक दिसू लागले. मशिनगनरने अंतराचा अंदाज घेतला. सुभेदारसाहेबानी खूण केली. मशिनगन तडतडू लागली. भारतीय सैनिकाच्या बदुकाच्या नळ्यातून पिंऽग-पिंऽग गोळ्या सुटूं लागल्या. शत्रु–सैनिक टेकडीच्या उतारावर कोसळू लागले शत्रु थबकला

पण सुभेदारसाहेब अनुभवी होते थोड्याच वेळात शत्रु फिरून हल्ला सुरू करील हें त्याना माहीत होतें. तीन भारतीय सैनिक प्राणातिक जखमी झाले होते. सुभेदारसाहेबानी इशारा केला.

भारतीय जवानांनी फिरून फळी बांधली. थोड्याच क्षणांत शत्रूने फिरून गोळीबार सुरू केला. गोळीबाराच्या मागोमाग किमान दोनशें चिनी सैनिक ठाण्याच्या रोखाने चाल करून येऊं लागले. गोळ्या चुकविण्याकरिता शत्रु–सैनिक पांगले. पण अचूक नेमबाजीच्या सरावामुळे भारतीय सैनिक त्यांना एक एक करून टिपूं लागले. शत्रूचीहि मारगिरी कमी नव्हती. त्यांच्या उखळी तोफांनी बदला घेतला. सुभेदारसाहेबाचे निम्मे सैनिक कामास आले होते. तरी उरलेल्यानी गोळीबार चालूच ठेवला. पुन्हा चिनी थबकले. त्यांनी माघार घेउन उंचवट्याचा आश्रय घेतला. त्यांचा दुसरा हल्लाहि निष्फळ ठरला.

इतक्यात एका जवानाचें लक्ष सुभेदारसाहेबांच्या मांडीकडे गेलें. मांडीस मोठी जखम झाली होती. त्यांतून रक्तस्राव होत होता. एक भीमकाय सैनिक म्हणाला, " सुभेदारसाहेब, तुम्ही जखमी झाला आहांत, चला मी आपल्या पाठीवरून तुम्हाला मागे घेऊन जातों." त्यावर सुभेदारसाहेब म्हणाले, " मी मागे जाणें शक्य नाही, माझे निम्मे जवान इथे मरून पडले आहेत, त्यांच्याशीं इमान राखलें पाहिजे." सुभेदारसाहेबानी खिशांतील बँडेज काढून मांडीची जखम बांधली. ते फिरून लढायला सज्ज झाले.

दहाच मिनिटांच्या विश्रांतीनंतर चिन्यांना नवीन कुमक येऊन पोचली. फिरून उखळी तोफा कडाडूं लागल्या. वीस लोक दोनशें-हून अधिक लोकांना तोंड देत होते. पण एकाच्याहि चेहऱ्यावर भीतीचा लवलेशहि दिसत नव्हता. प्रत्येकाच्या डोळ्यांत निग्रहाचें

तेज तळपत होते. चारी बाजूंना गोळ्या फुटत होत्या. ह्या खेपेस शत्रु निग्रहाने पुढे येत होता. इतक्यात ...... सुभेदारसाहेबानी पाहिले की, मशिनगन चालविणारा सैनिक प्राणांतिक जखमी होऊन खाली खदंकात कोसळला होता. मशिनगन बद ठेवणे धोक्याचें होतें. सुभेदारसाहेबानी एका उडींतच मशिनगन गाठली. दुसऱ्या क्षणीं मशिनगन पुन्हा तडतडूं लागली. पुढे येणारी शत्रूची राग डळमळूं लागली. पण मागून आणखी चिनी सैनिक मृताची जागा घेण्यास पुढे येतच होते. शत्रु–सैनिक आणखी जवळ आले. एकदोन मिनिटातच ते खंदकापाशीं येऊन पोचले असते.

सुभेदारसाहेबानी ओळखलें की, आपली व उरलेल्या जवानाची शेवटची घटका जवळ आली आहे. निर्वाणीच्या प्रतिकारास सज्ज होण्याची खूण त्यानी केली. उरलेल्या सैनिकानी म्यानातून संगिनी बाहेर काढल्या व त्या आपापल्या बंदुकींवर चढवल्या. त्याचीं तीक्ष्ण टोकें सूर्यप्रकाशात तळपू लागलीं मरता मरता मारता येतील तितके शत्रू मारण्याचा सुभेदार जोगिंदरसिंग व उरलेल्या मूठभर भारतीय सैनिकानी निश्चय केला मृत्यु अटळ आहे. तो कोणाला चुकत नाही. पण वीरमरण येणें हें भाग्याचें असतें. हें वीरमरण लाभण्याची त्याना संधि आली होती. ही साधि गुरु गोविंदसिंगाचे शूर वीर कसे घालवतील? सुभेदारसाहेब मोठ्याने गरजले, "सत् श्री अकाल". दुसऱ्या क्षणीं सुभेदारसाहेब व त्याचे मूठभर सैनिक वाघाच्या झेपेने खदकातून बाहेर आले.

संगीनधारी शीख सैनिक शत्रूच्या सेनासागरावर तुटून पडले. भारतीय संगिनी अनेक चिनी छात्यांत घुसल्या. हातघाईची लढाई झाली. शूर शीख बेभान झाले होते. 'सत् श्री अकाल 'च्या गर्जना करीत ते संगिनी चालवत होते. क्षणाक्षणाला त्यांची संख्या कमी होत होती. भारतीय सैनिक आनंदाने मृत्यूला कवटाळीत होते. अखेरचा शीख सैनिक कामास आला. ठाणे चिन्यांच्या हाती पडले. पण जोगिंदरसिंग आणि त्याच्या सैनिकांनी रक्ताच्या शाईने इतिहासाचे पान लिहिले.





# केवलसिंग

ही घटना वालॉंगच्या परिसरांत घडली. वालॉंगचें ठाणें महत्त्वाचें होतें. तिथून ब्रह्मी सरहद्द जवळ आहे. वालॉंगहून दक्षिणेकडे दिग्गुडच्या पेट्रोल खाणींकडे रस्ता जातो. वालॉंग ठाण्याच्या उत्तरेस हिंदी फौजेने टेहेळणी पथकांच्या चौक्या बसविल्या होत्या. अशा एका चौकीवर मूठभर भारतीय सैनिक होते. शेकडों वर्षांच्या कालखंडांत या दिशेने कोणत्याहि शत्रूने भारतावर आक्रमण केलें नव्हतें. चौकीच्या उत्तरेस वीस हजार फूट उंचीचीं हिमालयाचीं शिखरें दिमत होतीं. शेकडों वर्षें

हिमालयरूपी सैन्याने भारताचें रक्षण केलें होतें. पण आता आपण ज्यास दोस्त समजत होतों, त्याच चीनने आक्रमण सुरू केलें होते

२० तारखेस नेफातील इतर आघाड्यावर चिनी फौजानी केलेल्या आक्रमणाची खबर वालाँगलाहि येऊन पोचली होती. सर्व तुकड्याना सावध राहण्याचे इशारे देण्यात आले. वालाँगच्या उत्तरेकडील ह्या चौकीवर केवलसिंगाची नेमणूक झाली होती. लहानपणापासून बेडर व साहसी वृत्तीबद्दल तो आपल्या गावीं प्रसिद्ध होता. आपल्या साहसी वृत्तीस सैन्यात वाव मिळेल असें वाटून तो भरती झाला होता. असा हा निडर वीर चौकीजवळील आपल्या खंदकात बसला होता.

इतक्यात एक गोळी सूं सूं करत चौकीजवळच्या मातींत घुसली. केवलसिंगानें कान टवकारले. एकाएकीं शेकडों रायफलींचे आवाज ऐकूं येऊ लागले. चिन्यानी केवलसिंगाच्या चौकीवर हल्ला चढवला होता समोरच्या डोंगराच्या उतारावरून शेकडों चिनी चाल करून येत होते. चौकीनायकाने हुकूम दिला. हिंदी सैनिकाच्या रायफली मारगिरी करूं लागल्या. धीमेपणाने गडबड न करता प्रत्येक रायफल आपापल्या लक्ष्याचा वेध घेत होती. ह्या अचूक माऱ्यामुळे चिनी सैनिक गडबडले. आसऱ्याकरता ते डोंगराच्या आड गेले.

पण भारतीय सैनिकाना फार वेळ विश्रांति मिळाली नाही. चिनी अधिकाऱ्यानी आपल्या सैनिकाची नवी मांडणी केली.

मागून आणखी चिनी सैनिक येऊन त्याना मिळाले. थोड्याच क्षणानी अधिक सख्येने समुद्राच्या एकामागोमाग एक येणाऱ्या लाटाप्रमाणे चिनी सैनिकाच्या लाटा चौकीच्या दिशेने पुढे येऊ लागल्या. वातावरण उखळी तोफा, मशिनगन्स व रायफली याच्या आवाजाने निनादून गेलें भारतीय सनिक तहानभूक विसरले. दोन्ही बाजूचे सनिक कामास येऊ लागले अनेकजण जखमी झाले. गोळ्याचा पाऊस पडू लागला.

केवलसिंगाच्या शेजारी एक तरुण सैनिक उभा होता. एक चिनी गोळी त्याच्या छातीत घुसली तो खदकात कोसळला पण त्या जखमी सैनिकाने आपल्या तोंडावाटें दु खाचा उद्गारहि काढला नाही. होणाऱ्या यातना दाबून टाकण्याकरिता त्याने आपल्या मुठी घट्ट आवळल्या व डोळे मिटून घेतले केवलसिंगाने आपल्या मित्राकडे पाहिलें. त्याच्या डोळ्यात विलक्षण तेज चमकलें. त्याने मनाशी काही तरी निश्चय केला खालच्या आवाजात त्याने चिन्याना शिव्या हासडल्या मित्राच्या मृत्यूमुळे शत्रूबद्दल वाटणारा त्वेष उफाळून वर आला आपल्या मित्राच्या मृत्यूचा बदला घेण्याचें त्याने ठरविलें त्याचें अत करण त्वेषाने व द्वेषाने भारून गेलें शत्रू, सापडतील तितके शत्रु मारण्याचा एकच विचार त्याच्या मनात थैमान घालीत होता आजूबाजूला भारतीय सैनिक सारखे कामास येत होते आता त्याच्याने राहवेना त्याने बदुकीवर सगीन चढवली शत्रु-सैनिक अगदी जवळ येऊन ठेपले होते त्याच्या नरडीचा घोट घेण्याकरिता त्याची तळपणारी सगीन आतुर झाली होती.

शत्रु अगदी जवळ आलेला पाहतांच, " सत् श्री अकाल "ची गगनभेदी आरोळी ठोकून बेभान झालेला केवलसिंग शत्रूवर विद्युल्लतेप्रमाणे तुटून पडला. काड् काड् काड् त्याच्या गोळ्या उडत होत्या. समोर येईल त्या चिनी सैनिकाला तो भोसकत होता. चिनी लांडग्याच्या कळपांत सिंह शिरला होता. प्रत्येक मुसंडीबरोबर तो एकेक शत्रु मारत होता. कैक चिन्यांनी त्याच्यावर गोळ्या चालवल्या. संगिनीने त्यास भोसकलें. केवलसिंग रक्ताने न्हाऊन निघाला. वर्मी गोळी बसली. केवलसिंग आपल्या भूमातेच्या मांडीवर पडला. मातृभूमीच्या रक्षणार्थ तो हुतात्मा बनला. त्याचा हा भीम पराक्रम पाहणाऱ्या त्याच्या सैनिक बांधवांच्या छात्या अभिमानाने भरून आल्या. त्यांनीहि त्याच्यापासून स्फूर्ति घेऊन शत्रूला मारतां मारतां मृत्यु पत्करला. भारतीय सैनिकी परंपरेला त्यांनी उज्ज्वल केलें.



# खेमारामाची बहादुरी

खेमारामाची तुकडी लडाखमधील हॉटस्प्रिंग (उन्हाळी) जवळील ठाण्यावर होती. गेल्या दोन-तीन दिवसात समोरच्या चिनी चौकीमागे हालचाल दिसून येत होती. पण चिनी लोक बहुधा चौकीमागे रस्ता बांधीत असतील अशीच हिंदी सैनिकांची कल्पना होती. त्यामुळे आपल्या आघाडीवर काही विशेष घडेल असें त्यांना वाटलें नाही.

२० तारखेस सकाळीं चौकीतल्या रेडिओवर बातमी आली की, चिन्यांनी आक्रमण सुरू केलें आहे. ह्या विभागातहि कोणत्याहि

क्षणीं शत्रु चढाई करण्याचा संभव असल्यामुळे सर्व चौक्यानी जागरूक असावें असा हुकूम रेडिओवरून आला ज्या ठिकाणीं दळणवळणाची, रस्ता, रेल्वे, टेलिफोन किंवा तारयंत्राची सोय नसेल त्या ठिकाणीं दळणवळणकरिता सैन्यात छोटे रेडिओ वापरण्यात येतात हे सेट सैनिकाच्या पाठीवर राहू शकतात. कानाला ऐकण्याचें यंत्र व हनुवटीच्या खाली टेलिफोनसारखी बोलण्याची नळी असते. ह्या छोट्या सेटमधून ऐकणें बोलणें हीं दोन्ही कामें करता येतात रेडिओच्या शक्तीप्रमाणे एक ते दहा मैल अंतरापर्यंत ह्या तन्हेने दळणवळण चालू शकतें विशेषत डोंगर व जगल विभागात ही पद्धत फार उपयुक्त ठरते

खेमारामच्या ठाण्यातील सैनिक जागरूक राहूं लागले रात्रदिवस गस्त सुरू झाली २० तारीख निघून गेली आणखी एक-दोन दिवस निघून गेले तरी शत्रूची हालचाल काहीच दिसेना. पण शत्रु केव्हा तरी आपणावर अचानक हल्ला करील ही जाणीव प्रत्येकास होती तिसरी रात्रहि तशीच निघून गेली

२३ तारखेस सकाळीं चिन्यानी एकाएकी उखळी तोफांचा मारा सुरू केला प्रतीक्षेचा काळ संपला कृतीचा काळ जवळ आला चौकीवरील जमादारसाहेबानी हुकूम दिला, "शेवटची गोळी संपेपर्यंत प्रत्येकाने लढत राहिलं पाहिजे, गोळ्या संपल्यावर शिस्तीने पिछाडीकडील मोठ्या ठाण्यावर माघार घ्यावयाची" प्रत्येक जवान आपापल्या जागीं बंदूक सज्ज ठेवून शत्रूची वाट पाहू लागला

लढाई सुरू झाली. चिन्यानी उखळी तोफाचा पाऊस पाडला. चौकींत उखळी तोफ नव्हती. शत्रु जवळ येऊं लागला. तो जवळ आल्यावर हिंदी सैनिकानी मशिनगनचा मारा सुरू केला. हात बाँबचा वापर ते करूं लागले. शत्रु अधिकाधिक जवळ येऊं लागला. इतक्यात शत्रूच्या उखळी तोफेचा एक गोळा एकुलत्या एक मशिनगनवर पडून फुटला. मशिनगन छिन्नविच्छिन्न झाली. ती चालविणारे दोघेहि जवान कामास आले. भारतीय तुकडीची मारागिरी ( Fire Power ) कमी पडूं लागली. टोळधाडीप्रमाणे शत्रु चौकीवर चाल करून आला.

धूळ व धुरातून पुढे येणारे शत्रुसैनिक दिसूं लागले. खेमाराम आणि त्याचे साथीदार अचूक नेमबाजीने त्याना टिपूं लागले. पण मूठभर सैनिक चिन्याच्या लोंढ्यापुढे किती वेळ टिकाव धरूं शकणार होते ! पण चौकींतील भारतीय सैनिक विचलित झाले नाहीत. ते बेफिकीरपणे शत्रु टिपतच राहिले. इतक्यात उखळी तोफेचा एक गोळा खेमारामच्या खंदकात पडला. दुसऱ्या क्षणीं " धुडुम् " असा आवाज होऊन तो फुटला. खंदकातील खेमारामचे चारी साथीदार उखळी तोफेच्या गोळ्यास बळी पडले. खेमारामचा डावा हात जखमी झाला. त्याचीं बोटें निर्जीव झालीं. पण खेमाराम डगमगला नाही. एक हात निकामी झाला तरी अजून दुसरा चांगला होता शेजारच्या खंदकातील नाईक व शिपायास त्याने आवाज दिला. तो त्यास म्हणाला " तुम्ही मागे जा,

तुमच्या गोळ्या संपल्या आहेत." नाईक म्हणाला, "पण तूंहि आमच्याबरोबर आलें पाहिजेस." खेमारामने विचार केला, आपण तर जखमी झालोंच आहोंत. हे दुसरे धडधाकट आहेत. ते जिवंत राहिल्यास फिरून शत्रूशीं लढूं शकतील, ते वाचलेच पाहिजेत. खेमारामने त्यांना ओरडून सांगितलें, "तुम्ही मागे जा, मी शत्रूला रोखून धरतों, तुमच्या मागोमाग मीहि येतों, माझी काळजी करूं नका." ते दोघेजण मागे हटले. आता चौकींत एकटाच खेमाराम उरला होता. पण तो एका हाताने बंदूक चालवीतच राहिला. त्याच्या मारगिरीमुळे शत्रू थोडा वेळ थबकला आता खेमारामजवळ एकच गोळी उरली होती. त्याने शेवटची गोळी झाडली, शत्रु-सैन्याची एक छोटी तुकडी टप्प्यात आली होती. त्याने हात बाँबची पिन तोंडाने ओढून बाहेर काढली. हात बाँब शत्रूवर फेकला. उरलेला दुसराहि हात बाँब त्याने गोंधळलेल्या शत्रूवर फेकला. दोन्ही हात बाँबचे आवाज झाले. 'धाड् धाड्'. काही शत्रु-सैनिक मेले किंवा जखमी झाले. बाकीचे थबकले. त्याच्या चौकीच्या मागेच एक ओढा होता. खेमाराम क्षणात खंदकातून बाहेर आला. दुसऱ्या क्षणीं त्याने ओढ्यात उडी मारली. शत्रूंच्या गोळ्या डोक्यावरून गेल्या. उतारावरील झुडुपातून लपत छपत खेमाराम एक हात छातीशीं धरून खुरडत खुरडत पोचला. दोन दिवस आसऱ्याशिवाय व अन्नावाचून जगरातून तो चालतच राहिला. शेवटीं एका भारतीय टेहेळणी पथकाने त्याला सुखरूप मागे आणलें. त्याच्या हाताच्या

जखमेला औषधपाणी करण्यांत आलें. शत्रूशीं लढण्याची खेमारामची खुमखुमी अजून शिल्लक आहे. जखम बरी होऊन आपल्या पलटणींत परत जाण्याची तो उत्सुकतेने वाट पाहत आहे.



# गनर कांबळेची करामत

भारतीय सैन्यांत महार मशिनगन रेजिमेंट आहे. या रेजिमेंट-च्या पलटणींनी काश्मीर, लडाख व नेफामध्ये मोठें नांव कमावलें आहे. त्यांतील अनेक जवान, हुद्देदार व सरदार यांना 'महावीर' व 'वीर' चक्रें मिळालीं आहेत. भारताच्या इतर भागांत ऐतिहासिक काळांत ठराविक जमातींनीच हातांत शस्त्र धरलें आहे. पंजाबांत मुसलमान, जाट, शीख व राजपूत, काश्मीरांत डोगरा रजपूत, उत्तर प्रदेशांत मुसलमान, ब्राह्मण व राजपूत यांनीच पराक्रम केले आहेत. बाकीच्या जमातींनी शस्त्र सहसा हातीं धरलें नाही.

काही प्रातात तर पूर्वी सैन्यभरतीच होत नसे; पण महाराष्ट्र या गोष्टीस अपवाद होता आणि आहे. महाराष्ट्रात शिवाजीच्या काळापासून प्रत्येक जातीने हातीं शस्त्र धरलेलें आहे. महाराष्ट्रात संत जसे प्रत्येक जातींत झाले, तसेच प्रत्येक जातींत वीरपुरुषहि जन्माला आले आहेत. ब्राह्मणापासून महारापर्यंत प्रत्येक जातीने स्वराज्य-स्थापनेकरिता व स्वराज्यरक्षणकारिता रक्त साडले आहे.

ब्राह्मण, मराठा, कायस्थ प्रभु, सारस्वत या जातींप्रमाणेच शिवाजीच्या काळीं सुद्धा महारानी स्वराज्यस्थापनेच्या कार्यात हातभार लावला होता. शिवाजीच्या वेळचा प्रख्यात महार वीर शिदनाक हा होय. तेव्हापासून शिदनाक महाराच्या वशजाच्या आधिपत्याखाली मराठेशाहीच्या अखेरपर्यंत महार पथक लढलेलें आपणाला आढळून येतें. या महार वीराना इतर जातींच्या वीरा-प्रमाणेच सन्मानाने वागविण्यात येत असे. त्याबद्दलचें एक मनो-रंजक उदाहरण ऐतिहासिक कागदपत्रात आढळतें.

खड्यांच्या लढाईच्या वेळीं जुन्या परंपरेप्रमाणे शिदनाक महाराचें पथक मराठी सैन्यात होतें. सेन्याचा तळ पडण्याच्या वेळीं शिदनाक महाराच्या पथकाचे तबू सैन्याच्या मध्यभागीं आले, हें काहीं जातिनिष्ठ ब्राह्मण व मराठा सरदाराना आवडलें नाही. महार पथकाची छावणी मधून काढून ती बाजूला ठेवण्यात यावी असें त्याना वाटलें. याबाबत तक्रार करण्याकरिता या सरदाराचें एक शिष्टमंडळ सरसेनापतीकडे गेलें. त्या वेळीं मराठ्याचे सरसेनापति तासगावचे परशुरामभाऊ पटवर्धन होते. बाळपेशवा व नाना फडणीस

हेहि त्याच्याबरोबर होते. परशुरामभाऊ दुसऱ्या एका सरदाराशीं बुद्धिबळें खेळत बसले होते. तिथे ब्राह्मण व मराठा सरदारांचें शिष्टमंडळ जाऊन पोचलें. क्षेमकुशल झाल्यावर परशुरामभाऊंनी शिष्टमंडळाला भेटीला येण्याचें कारण विचारलें. त्यावर शिष्टमंडळाचे पुढारी म्हणाले, "भाऊसाहेब, आपल्या छावणींत मध्यमार्गी महार पथकाचा तळ पडला आहे, हें आम्हाला बरोबर वाटत नाही. त्याचा तळ आमच्यामधून बाजूस काढला पाहिजे." त्यावर परशुरामभाऊ रागाने बोलले, "तुम्ही इथे लढण्याकरिता आला आहात, का जातिभेद पाळण्याकरिता आला आहात ? रणांगणावर जातिभेदाला स्थान नसतें. रणागणावर एकच जात असते आणि ती म्हणजे मर्दाची. ब्राह्मण-मराठ्यांप्रमाणेच हे महार वीरहि स्वराज्यासाठी लढण्याकरिता इथे आले आहेत. मी रणांगणावर जातिभेद मानायला तयार नाही. तुम्हांला पाहिजे तर तुम्ही आपला तळ हालवा ; पण शिदनाकचा तळ आहे तिथेच राहील हें लक्षात ठेवा." शिष्टमंडळ खजील झालें. महारपथकाला सेनापतीच्या शब्दांनी धन्यता वाटली. त्या दिवशीं महारपथकाने अपूर्व कामगिरी दाखवून इतरांबरोबर आपली मर्दानी श्रेष्ठता सर्वांना पटवून दिली.

ब्रिटिशांनी महार जमातींतील लढाऊ गुण ओळखून महार पलटणी उभारल्या व मराठेशाहीच्या अखेरीस ब्रिटिशांनी कोरेगावची लढाई महार पलटणींच्याच जिवावर जिंकली. पुणे - नगर रस्त्यावरील कोरेगावजवळ या महार सैनिकांच्या पराक्रमाच्या स्मृत्यर्थ उभारलेला स्तंभ आजहि उभा आहे. पहिल्या महायुद्धानंतर

महार पलटणी तोडण्यांत आल्या. पण दुसरें महायुद्ध सुरू होतांच ब्रिटिशांनी फिरून महार पलटणी उभारल्या व महारांची खास मशिनगन पलटण उभारली. ती आजहि भारतीय सैन्यांत भारताच्या रक्षणांत महत्त्वाची कामगिरी बजावीत आहे.

गेल्या चिनी आक्रमणाच्या वेळीं महार पलटणीनें अपूर्व कामगिरी बजावली आहे. एका महार मशिनगन मोर्चावर शत्रूनें मोठ्या संख्येने हल्ला केला. भारतीय तुकडी प्राणपणाने लढत होती; पण चिनी सैन्याची मारागिरी जबरदस्त होती. एकेक भारतीय सैनिक जखमी वा मृत होऊं लागला. भारतीयांची संख्या कमी होऊं लागली. शत्रूला अवसान चढलें. लोंढ्याप्रमाणे त्यांचे सैनिक पुढे येऊं लागले. एवढ्या प्रचंड शत्रुसेनेला तोंड देणें शक्य नव्हतें. तुकडीतील उरलेल्या सैनिकांना माघार घेऊन मागच्या ठाण्यावर जाण्याचा हुकूम देण्यांत आला; पण सर्वच सैनिक माघार घेऊं लागले असते तर शत्रु त्यांच्यावर तुटून पडून सर्वांचीच कत्तल झाली असती. म्हणून एका मशिनगनवर शत्रूला थोपवून धरण्याची कामगिरी सोपविण्यांत आली. तिचा गनर ( म्हणजेच गन चालवणारा ) शिपाई कांबळे हा होता. त्याच्याबरोबर आणखी तीन महार वीर होते. कामगिरी अत्यंत धोक्याची होती. पण ती ह्या तुकडीने आनंदाने पत्करली.

ठाण्यांतील सैनिक जखमींना घेऊन माघार घेऊं लागले. ते मागील ठाण्यावर जाऊन पोचेपर्यंत शत्रूला थोपवून धरणें आवश्यक होतें. तें काम शिपाई कांबळे करूं लागला. त्याची मशिनगन

अर्धवर्तुळाकार फिरत होती तिच्या तुफान माऱ्यामुळे समोरच्या उतारावरून चाल करून येणारे शत्रुसैनिक रोखले गेले फक्त एकाच ठिकाणाहून मारगिरी होत आहे हे स्वकरच शत्रूला कळून आल त्याचा अर्थ, एक तर बाकीचे सर्व सैनिक कामास आले असले पाहिजेत किंवा त्यानी माघार घेतली असली पाहिजे व त्याची माघार यशस्वी व्हावी म्हणून ही मशिनगन मागे ठेवण्यात आली असली पाहिजे, हे त्यानी ओळखले पण त्याचबरोबर एका मशिनगनने आपल्याला रोखून धरावें, याचीहि त्याना चीड आली मशिनगनचा निकाल स्वकर लावल्यास माघार घेत असलेल्या हिंदी सैनिकाना गाठून त्याचा नि पात करता येईल, असे शत्रूला वाटू लागले सर्व शत्रुसैनिकानी मशिनगनच्या रोखाने मारगिरी सुरू केली उखळी तोफा मशिनगनचा वेध घेण्याचा प्रयत्न करू लागल्या, पण काबळे व त्याचे साथीदार यानी त्याची पर्वा केली नाही आपल्या ठाण्यातील माघार घेणाऱ्या सैनिकाचे जीव आपल्यावर अवलंबून आहेत, याची त्याना पूर्ण जाणीव होती दृढनिश्चयाने आपली कामगिरी पार पाडण्याच त्यानी ठरविले त्याना माहीत होत की, आपण जिवत परत जाऊ शकणार नाही आपल्या आत्मबलिदानावरच बाकीच्याचे जीव अवलंबून आहेत, या जबाबदारीची जाणीव त्याना होती जिवात जीव असेपर्यंत शत्रूला थोपवून धरण्याचा त्यानी निर्धार केला त्याच्या पैकी एक जण शत्रूच्या हालचाली दुर्बिणीतून पाहात होता तो गनर काबळेला सागत होता, "डावीकडे निशाण घे–बस्स

दुष्मन रोखला गेला, आता उजवीकडे नेम घे. त्या बाजूने दुष्मन पुढे येत आहे. शाब्बास! तिथेहि दुष्मन रोखला गेला. आता आपल्या समोरील बाजूने त्याच्या हालचाली सुरू झाल्या आहेत शाब्बास!" इतक्यात एक गोळी निरीक्षकाला लागली. तो खंदकात खाली कोसळला. दुसरे दोघेजण गोळ्याचा पट्टा मशिनगनला पुरवीत होते. एक मशिनगन किती दिशानी शत्रूला थोपवून धरूं शकेल! हळूहळू दुष्मन पुढे सरकत होते. पण गनर काबळ्यानी मारगिरी चालूच ठेवली होती. इतक्यात एक हातबाँब खदकात येऊन पडला. त्याच्या स्फोटाने काबळेचे साहाय्यक महार वीर कामास आले. काबळेच्या पायाला जखमा झाल्या. पण दात घट्ट आवळून होणाऱ्या वेदनाची पर्वा न करता काबळेने गन चालूच ठेवली होती. आता गनच्या चारी बाजूंना हात बाँब फुटूं लागले. उजव्या–डाव्या बाजूने शत्रुसैनिक त्याला घेरूं लागले. आणखी एक हातबाँब मोर्चात फुटला. त्याचा एक तुकडा त्याच्या हृदयात घुसला. काबळे गतप्राण झाला. तो मशिनगनवरच ओणवा होऊन पडला. पण त्याचा प्राण गेला तरी काही वेळ मशिनगन तशीच चालू राहिली. कारण मशिनगनचीं चटणें त्याने इतक्या जोराने दाबून ठेवलीं होतीं की, प्राण गेला, तरी त्याच्या हाताची पक्कड सैल झाली नाही. चटणावरचा दाब कमी पडला नाही. मशिनगन गोळ्याचा पट्टा संपेपर्यंत चालतच राहिली व तिने अनेक शत्रूचे बळी घेतले पुरंदरच्या वेढ्यात मुरारबाजींचें शिर उडालें तरी त्याच्या पट्ट्याचा हात तसाच

चालू राहून अनेक मोगल सैनिक मारले गेले, त्याप्रमाणेच गनर कांबळेच्या देहाने प्राण कुडी सोडून गेल्यावरहि अनेक शत्रु–सैनिकांचे बळी घेतले. शाबास त्याच्या जवानमर्दीची व दिलेरी रुस्तुमीची! जोपर्यंत असे वीर सैनिक भारतीय सैन्यांत आहेत, तोपर्यंत भारताच्या रक्षणाची काळजी वाटण्याचें कारण नाही.



## महाराष्ट्रीय वैमानीकाचा विक्रम

भारतीय संरक्षक दलात पूर्वी वैमानिक विभाग नव्हता. भारतीय दलाना मदत करण्याकरता इंग्लंडच्या वैमानिक दलाच्या काही तुकड्या भारतात ठेवण्यात येत. पण असा परावलंबीपणा उपयोगी नाही अशी खात्री पटून १९३१ साली भारतीय वैमानिक दलाची Indian Air Force स्थापना झाली. इंग्लंडमध्ये विमानदलाच्या पहिल्या उमेदवाराच्या तुकडींत के एअर मार्शल सुब्रत मुखर्जी होते.

गेल्या महायुद्धात सुरवातीस हिंदी विमानदलाच्या काही तुकड्या मध्यपूर्वेत पाठविण्यात आल्या होत्या. पण पुढे जपानी

आक्रमणामुळे या तुकड्या प्रथम आघाडीवर आणण्यात आल्या हिंदी विमानदलाने केलेल्या भरीव कामगिरीमुळे त्याच्या नावात फरक करून ते शाही भारतीय विमान दल Royal Indian Air Force बनल स्वराज्यप्राप्तीनंतर परकीय राज्याचा द्योतक असा ' शाही ' ( Royal ) शब्द गाळण्यात आला

भारतीय विमानदलाने जुना सरहद्द प्रांत, काश्मीर व नेफात उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे दोन वर्षांपूर्वी सयुक्त राष्ट्रसघाने कांगोंत बडखोर कटांगाविरुद्ध कारवाई सुरू केली त्या वेळी राष्ट्रसघाच्या दलाना मदत करण्याकरता हिंदी विमानदलाच्या काही तुकड्या पाठविण्यात आल्या या तुकड्यानी तेथे स्पृहणीय कामगिरी बजावली आहे

वैमानिकास नेहमीच मृत्यूशीं झुजावें लागतें विमान उडवताना व उतरताना नेहमी धोका असतो हवेंतच विमान बिघडलें किंवा पेटलें म्हणजे त्यातून सुखरूप परत येणें कठीणच असतें लढाईचे वेळी वैमानिकास १० ते ३० हजार फुटावर शत्रूच्या विमानाशीं झुजावें लागतें शत्रूच्या गोळ्यानी विमानाचें इंजिन बंद पडतें, पेट्रोल भडकतें, धुक्यात किंवा ढग आले असता उच्च पर्वतशिखराशीं टक्करून चक्काचूर होण्याचा धोका असतो युद्धात विमान उडलें तें परत उतरेपर्यंत वैमानिकाच्या जिवाची शाश्वती नसते प्रत्येक उड्डाण शेवटचेंच ठरेल अशी भीति असते. हवेंत सूर मारताना क्षणाचा विलब झाला तर विमान जमिनीवर आपटून त्याचा चक्काचूर होतो शत्रूच्या विमानाप्रमाणेच विमानविरोधक

तोफांनाहि त्यास तोंड द्यावें लागतें. वैमानिकाच्या अंगीं धैर्य, समयसूचकता, त्वरित निर्णय घेण्याची संवय, व थंडपणें काम करण्याचा वकूब असावा लागतो.

१९६२ ची गोष्ट आहे. हिंदी वैमानिक दलाची एक तुकडी कांगोमध्ये संयुक्त राष्ट्रसंघाच्या दिमतीस पाठविण्यांत आली होती. त्या तुकडींत टकले होते. ते फायटर बॉंबर पायलट आहेत. बंडखोर कटांगा विभागांत कामिना येथें मोठा विमान तळ आहे. संयुक्त राष्ट्रसंघाने हा तळ घेण्याकरता कारवाई सुरू केली. भूदलाला साहाय्य करण्याचें काम हिंदी विमान तुकडीवर सोपविण्यांत आलें होतें.

जमिनीवरून भूदल कामिनाच्या रोखाने पुढे सरकत होतें. त्याच वेळी कामिनाच्या विमानतळावर बॉंबहल्ला करण्याचा निर्णय घेण्यांत आला. विमानतळावर बॉम्बफेक करण्याच्या कामावर टकले यांच्या तुकडीस हुकूम मिळाला.

फायटर बॉंबर विमानांत एक पायलट व एक मदतनीस असतो. पायलट टकले यांचें विमान कामिनावर बॉम्बवर्षाव करण्याकरता निघालें. विमानांत बॉम्ब भरले होते. कुपे जातीच्या मोटारींत डोक्यावरच्या टपांत मागेपुढे करता येणारी खिडकी असते. त्याचें दार पुढेमागे सरकवतां येतें. तशीच व्यवस्था बॉंबरमध्ये असते. विमानाच्या पोटाच्या बाजूस मागेपुढे करता येणारें दार असतें. बॉम्ब ( साधारणपणें तीन बॉंम्बचा एक जुडगा [Stick] असतो. ) सोडते वेळी विमानाच्या पोटाच्या बाजूचें दार उघडण्यांत येतें व बॉम्ब सोडल्यावर तें फिरून बंद करतां येतें.

विमानतळावरून विमान निघालें. मध्यंतरींच्या प्रदेशावर कटांगी बंडखोराचा ताबा होता. या मधल्या टप्प्यात अनेक ठिकाणीं बंडखोराच्या चौक्या होत्या. मधल्या पट्ट्याचें निरीक्षण करीत टकले विमान चालवत होते. खालच्या कटांगी चौक्यातील सैनिकांनी वरून राष्ट्रसंघाचें विमान चाललेलें पाहिलें. विमान खालून चाललें होतें. त्याच्यावर कटांगी सैनिकांनी रायफल व मशीनगनचा मारा सुरू केला. टकले याना खालून गोळ्या झाडण्यात येत आहेत हें कळलेंहि नाहीं.

इतक्यात उजव्या बाजूस आवाज झाला. टकले यानी वळून पाहिलें बाजूच्या पत्र्यातून एक गोळी येऊन ती टकले याच्या डोक्यावरील छपरास छेदून गेली. टकल्यानी हें पाहून तोंडातून आश्चर्योद्गार काढला व शेजारच्या साथीदारास डिवचून डोक्यावरील गोळीने पाडलेल्या भोकाकडे अंगुलीनिर्देश केला. त्याच्याहि तोंडून उद्गार निघाला, "Oh, hell" दुसऱ्याच क्षणीं टकले याच्या मांडींतून आगीचा लोळ गेल्यासारखा चटका त्याना बसला. मशीनची गोळी मांडींतून आरपार गेली होती. त्याच्या कपाळावर घर्मबिंदु चमकले. भळभळा रक्त वाहू लागलें. टकल्यानी हातरुमालाने रक्तस्राव थांबवण्याचा प्रयत्न केला. पण रक्त थांबेना. वैमानिकाजवळ कापडावर छापलेला नकाशा असतो. तो वैमानिक साधारणपणे गळ्याभोवती गुंडाळतो. टकले यानी तो नकाशा गळ्यापासून काढला. विमानाची दिशा स्थित करून त्यानी जखमेवर रुमाल ठेवून त्याच्यावरून नकाशा बांधला. टकले पुढे न

जातां परतले असते तरी त्यांना कोणी दोष दिला नसता. पण टक्ल्याना तसें करणें पसंत पडले नाही. काहीहि करून दिलेली कामगिरी पुरी करण्याचें त्यानी ठराविलें. त्यानी विमान आधिक उंचावर नेलें. जखमेची आग होत होती. जखमेंतून—टीप–टीप रक्ताचे थेंब गळत होते. त्यानी दात घट्ट दाबून वेदना मारण्याचा प्रयत्न चालविला. क्षणाक्षणाला विमान पुढे जात होते. कामिनाचा विमानतळ जवळ येऊ लागला. विमानतळाच्या रक्षणाकरता बंडखोर कटागी सैनिकानी विमानविरोधक तोफा उभारल्या होत्या. विमानविरोधक तोफाचे गोळे आता उंच आकाशात फुटून त्याच्या धुराच्या छत्र्या आकाशात दिसूं लागल्या. लांब पल्ल्याच्या मशीनगन व बोफोर तोफा सुटूं लागल्या. तोफाचा मारा चुकवायचा होता. मग त्याच्या भडिमारातून तुफान-वेगात सूर मारून इच्छित लक्ष्यावर बॉंबफेक करायची होती. आता टक्ले आपली जखम विसरले. त्याच्यातील लढवय्या वैमानिक जागा झाला. लक्ष्यवेध करणें येवढेंच ते जाणत होते. त्यानी आपलें लक्ष्य हुडकलें. त्यावर सूर मारण्याकरता विमान फिरविलें. योग्य अंतर आहे याची खात्री पटल्यावर त्यानी सूर मारण्याचा दादा ओढला. विमानाचें नाक तिरकें खाली झालें. विमानाची गति सूर मारताना भयंकर वाढते. सूऽऽसूँऽऽसूँऽ—विमान विजेच्या वेगाने लक्ष्याकडे झेप घेऊं लागलें. लक्ष्य नेम-वर्तुळाच्या मध्ये येताच त्यानी बॉंब सोडण्याची कळ दाबली. सरक–दरवाजा मागे सरकला. बॉंबचा जुडगा लक्ष्याच्या दिशेने

सुटला सुरातून वर येताना फार काळजी घ्यावी लागते क्षणाचा विलंब झाल्यास विमान जमिनीवर धडकतें विमानाचा वेग त्या वेळी ताशी ७-८ श मैल असतो टकल्यानी दाडा दाबला खटका सुटला सर्व विमान हादरलें, पण दुसऱ्या क्षणीं सुरातून तें वर निघालें विमानाचें नाक वर झालें. तें आकाशात वेगानें उंच चढू लागलें टकल्यानी एक दीर्घ नि श्वास सोडला त्यानी आपलें कर्तव्य बजावलें होतें कामगिरी पार पाडली होती मधले काही क्षण आपणास जखम झाली आहे ही गोष्ट ते साफ विसरले होते सुरातून सुखरूप वर येताच मांडीची जखम दुखू लागली आग होऊ लागली, पण टकल्याच्या चेहऱ्यावर मंद हास्य उमटलें झालेल्या रक्तस्रावाने त्याना नि शक्तपणा वाटू लागला त्याचा विमानतळ जवळ येऊ लागला त्यानीं रेडियो संदेश पाठविला, " मी जखमी झालों आहें अशक्तपणा वाटत आहे पण मी सुखरूप उतरीन अशी खात्री आहे " विमानतळावर गडबड उडाली अग्निशामक व ॲम्ब्युलन्स गाड्या बोलावण्यात आल्या विमान दिसू लागलें कंट्रोलर दुर्बिणीतून विमानाकडे पहात होता तें स्थिर गतीने चाललें होतें त्याने रेडियोवरून वाऱ्याची दिशा व वेग वैमानिकास कळविला एक चक्कर घालून विमान खाली येऊ लागलें टकल्यानी सफाईने विमान उतरविले विमान थांबलें मागोमाग ॲम्ब्युलन्स येऊ लागली विमानात टकले स्वस्थ बसले स्ट्रेचर आलें तपासनीस विमान तपासू लागला विमानाच्या नाकात एक गोळी घुसली होती विमानाच्या शेपटींत आणखी

दोन भोकें दिसलीं. टकले यांनी उत्कृष्ट कामगिरी बजावली होती. त्याचा वरिष्ठ स्ट्रेचरपाशीं आला. आडव्या झालेल्या टकल्याशीं त्याने हस्तांदोलन केलें, " शाबास ! Well done Takle ! " टकले याना त्यांच्या या बहादुरीबद्दल वीरचक्र बहाल करण्यात आलें.



# नौदल वीरांची जोडगोळी

सैन्य किंवा आरमार शत्रूच्या विरुद्ध चढाईच्या ज्या योजना आखते त्यांस सांकेतिक नांवें देण्यांत येतात. योजना बाहेर फुटूं नये याकरता या सांकेतिक नांवाचा उपयोग करण्यांत येतो. १९६१ च्या डिसेंबरांत भारतीय सैन्य व नौदलाने पोर्तुगीज प्रदेशाविरुद्ध जी चढाईची योजना आखली होती तिला 'विजय' असें अर्थपूर्ण सांकेतिक नांव देण्यांत आलें होतें. या योजनेनुसार खुद्द गोवा, दमण, दीव व अंजदीव या चारी पोर्तुगीज प्रदेशांवर एकाच वेळी भू व नौदलांनी चढाई करावयाची होती. अंजदीव बेट आहे. या

बेटावर चढाई करून तें काबीज करण्याची कामगिरी भारतीय नौदलावर सोपविण्यांत आली होती. ती कामगिरी बजावतांना कमिशन्ड गनर अलिकल मोहमद यास त्याने दाखविलेल्या शौर्याबद्दल अशोकचक्र देण्यांत आलें.

भारतास येण्याचा जलमार्ग प्रसिद्ध पोर्तुगीज खलाशी वास्को-ड-गामा याने १४९८ साली शोधून काढला. भारतांत जलमार्गाने येणारे पहिले युरोपियन म्हणजे पोर्तुगीज होत. भारतावरील ताबा सोडून जाणारे शेवटचे युरोपियनहि पोर्तुगीजच होत. १५ व्या शतकाच्या अखेरीस व १६ व्या शतकाच्या सुरवातीस भारतांतील राजकीय परिस्थिति परकीय आक्रमणास अनुकूल होती. दिल्लीच्या सुल्तानांची सत्ता राजधानीबाहेर मानली जात नव्हती. निरनिराळे सुभेदार स्वतंत्र होत होते. राजपूत दिल्लीचें तख्त फिरून घेण्याकरता संधीची वाट पहात होते. माळवा, गुजराथमध्ये स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं होतीं. दक्षिणेंत बहामनी राज्याचे पांच तुकडे होऊन त्यांच्या विजयनगराच्या हिंदु राज्याशीं कटकटी चालू होत्या.. सर्वत्र अंदाधुंदी माजली होती. या संधीचा फायदा घेऊन पोर्तुगीजांनी १५१० सालीं गोवा घेतलें. अंजदीव बळकावलें. मुंबई पशाघालीं घातली. साष्टी, वसई, दीव, दमण हीं ठाणीं स्थापिलीं. पोर्तुगीजांनी नंतर धर्मप्रसाराकडे अधिक लक्ष दिलें. व हिंदूंचा अनन्वित छळ केला. त्यामुळे शिवाजीच्या वेळेपासून त्यांचे मराठ्यांशीं संघर्ष सुरू झाले. १ल्या बाजीरावाने उत्तर कोकणातून त्यांची हकालपट्टी केली. पुढे इंग्रजांचें अधिराज्य भारतावर स्थापन झालें टीनभर पोर्तुगीज

मुलख घेणे त्याना अवघड नव्हतें, पण इंग्लड व पोर्तुगाल या-मधील जुना स्नेह लक्षात घेऊन इंग्रजानी त्याची भारतातील ठाणीं तशींच राहूं दिलीं.

ब्रिटिशविरोधी मोहिम भारतात सुरू झाल्या की त्याचे पडसाद आपोआप गोव्यातहि उठत. १९४७ सालीं भारत स्वतंत्र झाला. ब्रिटिश निघून गेले त्याचे मागोमाग फ्रेंचानींहि भारतातून पाय काढला, पण पोर्तुगीज सुखासुखी आपले भारतातील प्रदेश सोडण्यास तयार नव्हते. १९४० व १९५६ सालीं गोवाविमोचनासाठी मोठ्या चळवळी झाल्या. पोर्तुगीज अमल भारतीय प्रदेशावर राहणें म्हणजे एक तऱ्हेचें भारताच्या संपूर्ण स्वातंत्र्यास गालबोटच होतें. शिवाय भारताच्या शत्रूंशीं सहकार्य करून पोर्तुगाल त्याना नाविक व लष्करी ठाणीं स्थापण्याची परवानगी देईल हीहि भीति होती भारत तटस्थतेचा पुरस्कर्ता होता, तर पोर्तुगाल नाटो संघटनेचा सदस्य होता. नाटो संघटनेचे नाविक वा वैमानिक तळ गोव्यात येणें भारताच्या तटस्थतेस बाधक ठरलें असतें. शिवाय भारतीयांच्याच हाडामासाच्या ६ लाख भारतीय प्रजेस परसत्तेच्या जोखडाखालीं नांदू देणें भारतास अपमानास्पद होतें. म्हणून लष्करी कारवाई करून पोर्तुगीज सत्तेचा भारताच्या भूमीवरून हकालपट्टी करण्याचा निर्णय भारत सरकारने घेतला व कारवाईची तयारी करण्याची आज्ञा भू, नौ व हवाईदलाना देण्यात आली.

तिन्ही दलप्रमुखानी गोवा-मोहिमेची योजना तयार केली. तिला 'विजय'योजना "Operation Vijaya" असें नाव देण्यात आलें.

ता. १८ डिसेंबर रोजीं गोवा, अंजदीव, दमण व दीव या चारी ठिकाणी सैन्य, आरमार व हवाईदलानी हल्ला करण्याचें ठरविण्यात आलें.

गोव्याच्या थोड्या दक्षिणेस कारवार जिल्ह्यास लागून अंजदीव बेट आहे. हें सुमारें ९ चौरस मैल आहे. किनाऱ्यापासून दीड-दोन मैल अंतरावर हें बेट आहे. दुरून हें बेट हिरवेंगार व सुदर दिसतें अगदी किनाऱ्यापर्यंत झाडी आहे. मध्यभागीं डोंगर आहे. येथे पोर्तुगीज किल्लेवजा गढी असून डोंगरावर मोर्चेबंदी करण्यात आली होती.

हें बेट घेण्याकरता बेटावर सैनिक उतरविणें आवश्यक होतें. अंजदीव घेण्याची कामगिरी नौदलावर सोपविण्यात आली होती. मोठ्या जहाजावरून छोट्या बोटींतून हे नौसैनिक पाठविण्यात यावयाचे होते ही कामगिरी धोक्याची होती निरनिराळ्या जहाजावर ही अवघड कामगिरी करण्याकरता स्वयंसेवक म्हणून स्वयंस्फूर्तीने कोण पुढे येतो याची चाचणी घेण्यात येताच शेकडों नौसैनिक पुढे आले. त्यांच्यातून जवानांची निवड करण्यात आली. एका मागोमाग तीनचार नावांच्या रांगा किनाऱ्याकडे जाणार होत्या. त्यानी किनाऱ्यावर पाय रोवल्यावर दुसऱ्या तुकड्या उतरून बेटाचा कब्जा घ्यावयाचा होता. सुरवातीस किनाऱ्यावर उतरणें धोक्याचें असतें कारण किनाऱ्यावरून येणाऱ्या बोटीवर मारगिरी करता येते

पहिल्या बोटींच्या आघाडीवरील बोटींत गनर चीफ पेटी ऑफिसर अब्दुल मोहमद होता हा धाडसी नौसैनिक केरळातील

आहे. इंग्रजी पांचवीपर्यंत शिक्षण घेतल्यावर तो १९४२ मध्ये भारतीय नौदलात भरती झाला. १९४३ साली त्याने भूमध्य समुद्रातील सिसिलीच्या मोहिमेंत भाग घेतला. १९४४ साली ब्रह्मदेशच्या किनाऱ्यावर रामरी बेट काबीज करण्यात तो सहभागी होता. तीन वेळा इंग्लंडमधील निरनिराळ्या नाविक शाळात त्यास शिक्षणाकरता पाठविण्यात आलें तो नाविक तोफखान्यात शिक्षक बनला. अंजदीव बेटावर उतरण्याकरता तो स्वयंस्फूर्तीने पुढे आला.

पहिल्या बोटींचा ताफा निघण्यापूर्वी भारतीय विमानदलाने अजदीव बेटावर उड्डाण करून तेथील सैनिकास शरणागतीचा आदेश देणारीं पत्रकें टाकलीं. मोठ्या बोटी किनाऱ्यापासून कांही अंतरावर उभ्या होत्या. मोठ्या लढाऊ बोटीवरून छोटया नावा खालीं सोडण्यात आल्या. दोराच्या शिडीवरून नौसैनिक खाली उतरून छोटया नावात बसूं लागले. हत्यारें खाली सोडण्यात आलीं. दर्यासारंग दुर्बिणीने बेटाचें निरीक्षण करीत होते. मोठ्या लढाऊ जहाजावरील तोफाना त्यानी बेटावरील महत्त्वाच्या जागावर तोफा रोखण्याची आज्ञा दिली. बोटी किनाऱ्यास लागताच जहाजावरील तोफाना त्यांना संरक्षण देण्याकरता संरक्षक मारागिरी ( Covering Fire ) करण्याचा हुकूम देण्यात आला. तोफा सज्ज झाल्या होत्या. गोलंदाज हुकमाची अपेक्षा करीत अधीरतेने उभे होते. आता काय होतें या जिज्ञासेने सर्वांचे डोळे त्या किनाऱ्याकडे जाणाऱ्या नावांवर व बेटावर खिळले होते.

इतक्यात बेटाच्या सर्वोच्च मोर्चेबंदीवर पांढरें निशाण फडफडूं लागलें शरणागतीचें तें प्रतीक होतें. शहाणपण सुचून पोर्तुगीज

शिबंदीने शरण जाण्याचें ठरविलें असावें असें सर्वांस वाटलें. अधीरता कमी झाली.वरिष्ठ अधिकाऱ्यानी नि:श्वास सोडला.बोटी किनाऱ्याच्या जवळ जाऊं लागल्या. त्या किनाऱ्यापासून शभर यार्डांवर आल्या. इतक्यात एकाएकीं भयंकर गोळीबार सुरू झाला. किनाऱ्यावरून पोर्तुगीजानी मशीनगन्स व उखळी तोफा सुरू केल्या.काही गोळे पाण्यात पडले. मशीनगनच्या गोळ्या बोटींच्या लाकडी फळ्यात घुसल्या. क्षणात अनेक नौसैनिक जखमी झाले. पोर्तुगीजानी बेइमानी केली होती. शरणागतीचा पाढरा झेंडा लावून, बोटींतील लोक किंचित् गाफिल झालेले पाहून, त्यानी एकदम मारगिरी सुरू केली. उघड्या बोटींतून तोफा व मशीनगन्सच्या मारगिरींत किनाऱ्यावर उतरणें व तेथे पाय रोवणें फार कठीण असतें.

पण किनाऱ्याकडे जाणाऱ्या बोटी विचलित झाल्या नाहीत. त्या तशाच, मारगिरीची पर्वा न करता, किनाऱ्याकडे सरकतच राहिल्या. बोटी किनाऱ्यावर थडकल्या. पहिल्याच बोटींत चीफ पेटी ऑफिसर मोहमद होते. त्यानी हत्यारासह किनाऱ्यावर उडी टाकली. मागोमाग मशीनगन्स व रायफली घेऊन नौसैनिकानी पोर्तुगीजाच्या मारगिरीस न जुमानता धडाधड उड्या मारल्या. गुडघाभर पाण्यातून ते पुढे चालले. पाण्यात त्याच्या आजूबाजूस हस्त नक्षत्राच्या पावसाप्रमाणे गोळ्याचा पाऊस पडत होता. मागून बोटींची दुसरी राग यावयाची होती त्याना संरक्षण देणे आवश्यक होतें. चीफ पेटी ऑफिसर मोहमद यांनी आपल्या सैनिकाची विभागणी केली. बेटावरील टेकडीवरून शत्रु मारगिरी


केलमन

करत होता. टेकडीच्या उतारावर एक कमरेइतकी भिंत होती. तिच्या मागे शत्रूच्या उखळी तोफा व मशीनगन्स होत्या. दमत दमत भारतीय सैनिक चीफ पेटी ऑफिसर मोहमदांच्या नेतृत्वा-खाली टेकडीवरील भिंतीच्या रोखाने सरकू लागले. सर्वांत आघाडीवर मोहमद होते. ते आता भिंतीच्या जवळ आले. कमरेचा हातबाँब त्यांनी हातीं घेतला. त्याची सेफटी पिन काढून त्यांनी हातबाँब भिंतीवरून पलीकडे टाकला. त्याचा स्फोट होऊन भिंतीमागील पोर्तुगीज बंदूकबहाद्दर गोंधळले. तात्काळ मोहमद व इतर अनेक हिंदी नौसैनिकांनी वीरगर्जना करीत भिंतीवरून पलीकडे उड्या मारल्या. नौ-सैनिकांच्या कराल संगिनी बघून पोर्तुगीज सैनिकांनी जंगलाच्या रोखाने धूम ठोकली. भिंतीआडील मशीनगन्स व उखळी तोफा बंद पडल्याने मागून येणाऱ्या बोटींवरील नौसैनिकांना किनाऱ्यावर उतरणें सोपे झालें.

टेकडीच्या वरच्या उतारावर काही घरें होतीं. त्या घरांतूनहि गोळीबार होत होता. आता मोहमदांनी या घराकडे नजर वळविली. तीन संगीनधारी नौसैनिकांना घेऊन त्यांनी घर–घर शोधण्यास सुरवात केली. भारतीय नौसैनिकांस येतांना पाहताच घरातून लपून गोळीबार करणाऱ्या पोर्तुगीज सैनिकाचें धैर्य पळालें.

प्रत्येक घरातून १–२ पोर्तुगीज सापडले. १२ पोर्तुगीज सैनिक एकाहि गोळी न झाडता त्यानी कैद केले. या त्याच्या कामगिरीबद्दल त्याना अशोकचक्र देण्यात येऊन त्याना कमिशनहि देण्यात आलें.

पहिल्या बोटींतील मोहमदाची हकीगत वर सांगितली. त्या पहिल्या बोटीच्या मागोमाग भारतीय नौसैनिकाची दुसरी तुकडी बोटींतून किनाऱ्याकडे येऊ लागली. त्याचे नेतृत्व कमिशण्ड गनर नोएल केलमन याचेकडे होतें पहिल्या बोटी किनाऱ्यास लागतात न लागतात तोंच नव्या बोटींची रांग किनाऱ्याजवळ येऊं लागली. त्याचेवरहि पोर्तुगीजानी गोळ्याचा भडिमार केला. त्यातील एक गोळी केलमनच्या दोन्ही माड्यातून आरपार गेली. भळभळा रक्त वाहूं लागलें. बोटीचा तळ रक्तलांछित झाला. पण केलमन रेसभरहि हालले नाहीत. बोटींतील जवानाना धीर देत बोट किनाऱ्याकडे आगेकूच करीत त्यानी ठेवली बोट वाळूंत रुततांच त्यानी उडी मारून बरोबरच्या नौसैनिकासह टेकडीवर हल्ला चढविला. एकामागून एक शत्रूचे मोर्चे यानी साफ केले. स्वतःच्या जखमेकडे लक्ष न देता ते देवसमर लढत राहिले. संध्याकाळ


आलिअल मोहमद

झाली. सर्व बेट ताब्यांत आलें. शेकडों शत्रुसैनिक शरण आले. त्यानंतरच त्यांनी डॉक्टरांकडून स्वतःला मलमपट्टी करून घेतली. त्यांच्या कामगिरीबद्दल त्यांना बढती मिळून ते लेफ्टनंट झाले. त्याना अशोकचक्र बहाल करण्यांत आलें. असे पराक्रमी वीर आपल्या संरक्षकदलांत आहेत.

★ ★ ★

# लेखकाचे दोन शब्द



" भारताचे परमवीर " हें पुस्तक वाचकांना सादर करतांना अत्यंत आनंद वाटत आहे. हें पुस्तक एका विशिष्ट हेतूने लिहिलें आहे आपल्या भारतावर गेल्या ऑक्टोबरमध्ये चीनने आक्रमण केलें. ह्या आक्रमणामुळे देशात अभूतपूर्व जागृति होऊन देशातील सर्व जनता शत्रूस निकराने तोंड देण्याकरता सरकारच्या पाठीशीं उभी राहिली. सामान्य जनतेंत उत्साहाची अपूर्व लाट उसळली. हा उत्साह कायम टिकविणें अत्यंत आवश्यक आहे दीर्घकाळ चालणाऱ्या लढ्यात ज्या बाजूचें मनोधैर्य अधिक उच्च प्रतीचें असतें, त्याच बाजूस विजयश्री शेवटी माळ घालते एका इंग्रज सेनापतीने म्हटलें आहे, " Moral is to the physical as one to ten. " याचाच अर्थ नीतिधैर्य हें शारीरिक बळापेक्षा १० पट सामर्थ्यवान् असतें. हें नीतिधैर्य टिकविण्याकरता मनाची विशिष्ट घडण असावी लागते. त्याकरताच हें पुस्तक लिहिलं आहे

२० ऑक्टोबरपासून २१ नोव्हेंबरपर्यंत चाललेल्या ३१ दिवसांच्या या युद्धात भारतीय सैनिकांनी अनेक ठिकाणीं प्राणपणाने झुजून भीमपराक्रम केला. देशाच्या रक्षणाकरता शेकडो वीर सैनिकांनी आत्मबलिदान केलें पण आपली अपुरी तयारी, शत्रूने केलेला अचानक हल्ला यामुळे काही ठिकाणीं आपणास माघार घ्यावी लागली, ही गोष्ट खरी असली तरी, लडाखमध्ये चिनी फौजाना सर्व गोष्टी अनुकूल असतानाहि ते १५ मैलापेक्षा अधिक प्रगति करू शकले नाहीत वालोंगच्या लढ्यात चिन्याची अपरिमित नुकसानी झाली. प्रतिकूल परिस्थिति, डोंगरी व उंचावरील लढाईच्या अनुभवाचा अभाव, कडाक्याची थंडी, कमी मारगिरीची शस्त्रें या उणिवा असूनहि भारतीय सैनिकांनी जो पराक्रम केला, त्याबद्दल कोणत्याहि देशास अभिमानच वाटेल.

न्यूनगंड हा नेहमीच वाईट असतो. पुष्कळ लोकांना परकीयांचे गुण दिसतात, पण आपल्याच देशबांधवांचें डोंगरासारखें कर्तृत्व त्यांना दिसत नाहीं. गेल्या दोन्ही महायुद्धाचे वेळीं जर्मन फौजाच्या पराक्रमाचीं वर्णन करण्यात आपल्यातील्या अनेक लोकांस आनंद वाटे. जपानी फौजाचेंहि भारतात मोठें कौतुक करण्यात येई. पण याच जर्मन व जपानी फौजाना धूळ चारणाऱ्या भारतीय जवानांचे पोवाडे कोणीं गायिले नाहीत, याचें कारण माझ्या मतें आमच्या न्यूनगंडात होतें. आमच्यावर राज्य करणाऱ्या परक्या ब्रिटिशांचा पराभव करणारा तो मोठा, असें आम्हास वाटे. पण शेवटीं दोन्ही महायुद्धांत इंग्लंडच विजयी झालें. या इंग्लंडच्या विजयात भारतीय सैनिकांचा फार मोठा वाटा होता.

आपण राणा प्रताप, शिवाजी, बाजीप्रभु देशपांडे, मुरारबाजी, तानाजी यांच्या वीरकथा तन्मयतेने ऐकतों व वाचतों. पण त्यांच्या आमच्या वंशजातहि त्यांच्या पराक्रमाचें तेज कायम आहे, हे आपण विसरून जात होतों. जीवनात व विशेषत: सैनिकी जीवनात परंपरेला फार महत्त्वाचें स्थान आहे. मनुष्य ध्येयाकरिता व परंपरेकरिता लढत असतो व मरत असतो. परंपरा जिवंत ठेवण्याचें एक साधन म्हणजे आपल्या पराक्रमी पूर्वजांच्या अतुल धैर्याचे आणि शौर्याचें पोवाडेगायन हें एक आहे. "शूर मर्दांचा पोवाडा, शूर मर्दाने ऐकावा" असें महाराष्ट्राच्या एका प्रसिद्ध शाहिराने म्हटलें आहे. डफावर थाप पडली आणि तानाजी, बाजीच्या अपूर्व बलिदानाचें गुणगान सुरू झालें की ऐकणाऱ्याचीं मनें थरारून जातात, सुप्त असलेल्या शौर्याचा स्फुल्लिंग जागृत होतो, व पोवाड्याचे विषय बनलेल्या वीरांच्या पावलावर आपणहि पावलें टाकावीं, अशी ईर्षा तरुणाच्या मनात जागृत होते.

आजचीं मुलें व तरुणच उद्याचे नागरिक आहेत. त्यानांच भविष्यकाळात भारताच्या स्वातंत्र्याचें रक्षण करावयाचें आहे. तें रक्षण करण्याची स्फूर्ति त्यांना मिळावी याकरिताच ह्या वीरकथा लिहिल्या आहेत. ह्या वीरकथांनीं भावी पिढीत देशाकरिता आत्मबलिदान करण्याची प्रवृत्ति निर्माण व्हावी, हीच इच्छा आहे.

गेल्या दोन महायुद्धांत भारतीय सैनिकांनी आपल्या पूर्वजांच्या उज्ज्वल परंपरेस साजेल असा भीमपराक्रम अनेक ठिकाणीं करून दाखविला. पलटणी-पलटणींत पराक्रमाची स्पर्धा असते. आपल्या पलटणीस अमुक अमुक वीरचिन्हें मिळालीं आहेत, असें पलटणवाले अभिमानानें सांगतात. एखाद्या लढाईत एखाद्या पलटणीनें विशेष पराक्रम केला तर, त्या पलटणींत त्या विजयाचा दिन थाटानें साजरा करण्यात येतो. विशिष्ट पराक्रमाबद्दल पलटणींना आपल्या ध्वजावर त्या लढाईचें नांव कोरण्याचा मान मिळतो. अशा मानास Battle honour म्हणतात. मग ती पलटण आपला लौकिक कायम ठेवण्याकरिता आटोकाट प्रयत्न करते. पलटणीच्या प्रतिष्ठेकरिता सैनिक आत्मबलिदान करण्यास मागेपुढे पाहत नाहींत. यालाच सैनिकी भाषेत "Pride of the regiment" असें म्हणतात.

आपला भारतीय सैनिक जगातील कोणत्याहि देशाच्या सैनिकापेक्षा कोणत्याहि दृष्टीने कमी नाही. अनेक बाबतींत तो इतर देशाच्या सैनिकापेक्षा श्रेष्ठ आहे. सर्व भारतीयांना अभिमान वाटावा असे पराक्रम आपल्या शूर सैनिकांनी केले आहेत.

सैनिकांना (त्याचप्रमाणे नौदल व वायुदल सेनेतील सैनिकांना) त्यांच्या पराक्रमाबद्दल सन्मानदर्शक पदकें देण्यात येतात. स्वातंत्र्यापूर्वी भारतीय सेनेंत व्हिक्टोरिया क्रॉस, मिलिटरी क्रॉस, D. S. O. I. D. S. M. अशीं पदकें व O B. E., M. B. E. यासारखे बहुमानदर्शक किताब व सरदार-बहादुर यांसारख्या पदव्या देण्यांत येत. पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारत सरकारने भारताच्या संरक्षक दलाकरिता नवीं पदकें सुरू केलीं आहेत. त्यांपैकी सर्वोच्च पराक्रमाकरिता 'परमवीरचक्र' देण्यांत येतें. त्याच्या खालोखाल 'महावीर-चक्र', 'वीरचक्र', 'विशिष्ट सेवा मेडल' हीं पदकें परक्या शत्रूशीं लढतांना केलेल्या पराक्रमाबद्दल देण्यांत येतात. इतर वेळीं केलेल्या पराक्रमाबद्दल 'अशोकचक्र' देण्यांत येतें. अशोकचक्रात तीन वर्ग असतात. पहिला, दुसरा व तिसरा. ज्या शूर सैनिकांस व अधिकाऱ्यास हीं पदकें मिळतात, त्यांना केंद्र-सरकारकडून ठराविक मानधन मिळतें. व राज्य सरकारकडून खास देणग्या देण्यात येतात.

या पुस्तकांत गेल्या दोन्ही महायुद्धांत, गेल्या ऑक्टोबरमधील चीनशी झालेल्या संघर्षात, नागा बंडखोरांशी लढण्यांत व कांगोमध्ये यूनोतर्फे कामगिरी बजावण्यांत ज्या भारतीय वीरांना व्हिक्टोरिया क्रॉस, परमवीरचक्र, वीरचक्र *किंवा अशोकचक्र मिळालें आहे, अशा बहादुरांच्या वीरकथा आहेत. त्या* वाचून नव्या पिढीला त्यांच्यासारखाच पराक्रम करण्याची स्फूर्ति मिळो, अशी *इच्छा प्रगट करून हे प्रास्ताविक दोन शब्द मी संपवितों.*

---

# भारतीय संरक्षण दलाची

# मानचिह्नें






# भारतीय संरक्षण दलाची

# मानचिह्नें




